


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२९४७

अं. १२९ . १३० . १३१ . १३२

संपादक - वा. रा. ढवळे

वर्ष 33 अंक १२९ एप्रिल - मे - जून १९५९

वर्ष 33 अंक १३० जुलै - ऑगस्ट - सप्टेंबर १९५९

वर्ष 33 अंक १३१ ऑक्टोबर - नोव्हेंबर - डिसेंबर १९५९

वर्ष 33 अंक १३२ जानेवारी - फेब्रुवारी - मार्च १९६०





महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १३०  जुलै—ऑगस्ट—सप्टेंबर १९५९

या अंकांत



संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २

महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

अनुक्रमणिका

# साभार-स्वीकार

१ संशोधकांचें बालपण-( भाग २ ) ना. वा. कोगेकर; पाठक प्रकाशन, मिर्झा स्ट्रीट, मोतीबाजार, मुंबई २.

२ सेवा ( नाटक )-प्र. श्री. कोल्हटकर; मॉडर्न बुकडेपो, पुणें २; रु १=५०

३ गीतेच्या श्लोकावरील प्रवचनें ( भाग १ )-संपा. स. के. नेऊरगांवकर, ल. वि. कर्वे, शं. वा. दांडेकर; ९७४ सदाशिव, पुणें २; रु. १=५०

४ विश्वव्यापी मानव-धर्म - गणपत नानाजी इंबीर, कि. गे. बाणकर, खडकवासला; ६ आणे.

५ सुखाचें रहस्य - ले. प्रका. - शांतीलाल सी. शहा; १२४ रविवार, पुणें २; रु. १=२५

६ नव्हाळी ( कवितासंग्रह ) - संपा. मांडवकर, भोयर, साखरकर, सेलूकर; सेवा प्रकाशन, नागपूर; रु. २=५०

७ काम पुरुषार्थ- ग. सी. पेंडसे; कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; १० रु.

८ सुलभ तालिकाकरण - कृ. शं. हिंगवे; कार्यवाह, महाराष्ट्र ग्रंथालय संघ, ५६८ नारायण, पुणें २; रु. २=५०

९ श्रोते हो - म. म. द. वा. पोतदार; व्हीनस बुकस्टॉल, आप्पा बळवंत चौक, पुणें २; ४ रु.

१० मराठीका भक्ति साहित्य - भी. गो. देशपांडे; चौखंबा विद्याभवन, चौक वाराणसी १; रु. ८

११ गंधवती ( प्रा. शिक्षकांचा काव्य-संग्रह )- संकलक- प्र. अ. भारती; सुप्रभा प्रकाशन, बडनेर; ७५ न. पै.

### कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणें २ यांचीं प्रकाशनें:—

१२ अमृत तुषार-ग. वि. अकोलकर; २ रु.

१३ टिळकदर्शन- गोविंद तळवलकर, २ रु.

१४ मराठीचें साहित्यशास्त्र (द्वि. आ.) - मा. गो. देशमुख; रु. ७=५०

### मौज प्रकाशन, खटाववाडी मुंबई ४ यांचीं प्रकाशनें:—

१५ गांवाकडच्या गोष्टी ( द्वि. आ. ) - व्यंकटेश माडगूळकर; रु. ४=५०

१६ पांढरे केस हिरवीं मनें - वि. द. घाटे; रु. ४

### ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २ यांचीं प्रकाशनें:—

१७ कला-विमर्श - बालकृष्ण दाभाडे; रु. ३

१८ कडू साखर ( द्वि. आ. )- ग. ल. ठोकळ; रु. ३=५०

१९ ठोकळ गोष्टी ( भाग १ )-ग. ल. ठोकळ; रु. ४

२० बारा बलुतेदार-शंकरराव खरात; ३ रु.

---

२१ संस्कृत प्रतिमा - प्रथम उन्मेष: प्रथमो विलास: एप्रिल १९५९, साहित्य अकादमी, न्यू दिल्ली.

२२ पुण्यात्मा पांडुरंग - लेखक : श्री. भ. वा. अघोर; सौभाग्य लक्ष्मी प्रकाशन, सोलापूर; मूल्य १॥ रु.

२३ पंचमी-काव्यसंग्रह : संपादक : भ. वा अघोर; कवित्रय मंडळाचें पांचवें प्रकाशन, सोलापूर; मूल्य १२ आणे

२४ मुक्तामाला ( १० वी आवृत्ति ) - ले. लक्ष्मणशास्त्री हळबे; मॉडर्न बुकडेपो, पुणें २; रु. २=५०

---

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १३० जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९५९

## संपादकीय

### कै. प्रो. मा. दा. अळतेकर

कै. प्रो. माधव दामोदर अळतेकर हे ता. २० ऑगस्ट १९५९ गुरुवारीं सकाळीं हृदयक्रिया बंद पडून अकस्मात् कालवश झाले, ही घटना येथे नमूद करतांना मला अत्यंत दुःख होतें ! मृत्युसमयीं त्यांचें वय ६९ वर्षांचें होतें. गेलीं आठ वर्षे प्रकृति बरी नसल्यामुळे, ते सभासंमेलनांतून दिसत नसत; आणि सर्वसामान्य लोकांपासून ते जणू दृष्टीआड झाल्यासारखे झाले होते हें खरें आहे. पण इ. स. १९२० ते १९४५ या मधल्या पंचवीस वर्षांच्या अवधींतले ऐन उमेदींतले प्रो. अळतेकर ज्यांनी पाहिले असतील त्यांना त्यांचा कधींहि विसर पडणार नाही, एवढें त्यांचें व्यक्तित्व अविस्मरणीय होतें. त्या कालांतलीं पंधरा–वीस वर्षे साहित्यिक–सामाजिक क्षेत्रांत फार खळबळीचीं होतीं. 'नवनीति' आणि 'नवमत' या नांवांनी कांही विचारांनी समाजांत प्रवेश केला होता आणि त्यांचा साहित्य–निर्मितीवरहि परिणाम होत होता. त्यामुळे नवमतवादावर आणि नवसाहित्यावर सतत सभा, चर्चा होत असत. त्या काळांत आपल्या दणदणीत व अमोघ वक्तृत्वाने प्रो. अळतेकरांनी अनेक सभा गाजविल्या व जिंकल्या. ह्यांपैकी 'विभावरी वाङ्मया' वर मुंबईतल्या रॉयल ऑपेरा

अनुक्रमणिका



हॉउसमध्ये झालेल्या चर्चेतलें त्यांचें भाषण भाषा, विचार व शैली या सर्वच गुणांनी वक्तृत्वाचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून अनेकांच्या स्मरणांत अजूनहि राहिलेलें असेल. हलक्या स्वरांत आणि मोजून शब्द उच्चारीत ते आपल्या भाषणाला आरंभ करीत. हळूहळू त्यांचा आवाज चढूं लागे आणि वक्तृत्वाचा रंगहि. खणखणीत व किंचित् अनुनासिक आवाज, स्वच्छ वाणी, शुद्ध मराठी भाषा, मिस्किल उपरोध आणि उपहास व मार्मिक पाठांतर यांमुळे त्यांचें वक्तृत्व अतिशय प्रभावी ठरे. प्रतिपक्षाच्या मर्मावर नेमका आघात करून ते त्याला नामोहरम करीत.

इ. स. १९२३ सालीं मुंबई येथील विल्सन कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ति झाली. पण त्यापूर्वींच त्यांनी सार्वजनिक जीवनांत प्रवेश केला होता. इंग्रजी व मराठी नियतकालिकांचें संपादन त्यांनी केलें होतें. इ. स. १९१५–१६ सालीं 'इंदुप्रकाश' या दैनिकाचे ते संपादक होते. त्यानंतर १९१७ ते १९२० या काळांत 'न्यू रिव्ह्यू'चे संपादक म्हणून त्यांनी काम केलें. १९२३–२४ मध्ये 'इंडियन टेक्स्टाइल जर्नल'चे ते दुय्यम संपादक होते. इ. स. १९१६ च्या जुलैमध्ये मुंबईंत पहिला आगरकर-स्मृतिदिन साजरा झाला तो प्रा. अळतेकरांच्या प्रयत्नांमुळेच. (या सभेचा वृत्तान्त त्यांच्याच शब्दांत याच अंकांत इतरत्र दिला आहे.) बी. ए. ला त्यांनी गणित विषय घेतला होता आणि एम्. ए. ला अर्थशास्त्र. 'हिंदी अर्थशास्त्र' या नांवाचा ग्रंथहि त्यांनी लिहिला आहे. अर्थशास्त्र व व्यापार विषयांतील त्यांचें ज्ञान लक्षांत घेऊन महाराष्ट्र साहित्य परिषदेने 'व्यापार व उद्योगधंदे व त्यांचीं अर्थशास्त्रीय साधनें' हा ग्रंथ लिहिण्याची त्यांना विनंती केली होती. कोल्हापूरला विद्यार्थिदशेंत गुरु. विष्णु गोविंद विजापूरकर यांचा सहवास त्यांना लाभला होता. नागपूरचे दिवंगत कामगार-पुढारी रामभाऊ रुईकर हे त्यांचे मावस-बंधु. आचार्य जावडेकर हे त्यांच्यापेक्षा लहान पण निकटवर्ती. असे विविध संस्कार घडलेलें त्यांचें व्यक्तिमत्त्व साहजिकच बहुविध आणि समृद्ध झालें होतें.

राजकारणांत ते प्रागतिक पक्षाचे होते. त्या पक्षाचे ते कित्येक वर्षें चिटणीस होते. त्या पक्षांतल्या सर कावसजी जहांगीर, सर सी. वाय्. चिंतामणी, रँग्लर परांजपे इत्यादि प्रमुख पुढाऱ्यांशीं त्यांचे निकटच्या स्नेहाचे संबंध होते. पी. ई. एन्. या आंतरराष्ट्रीय लेखक-संघाच्या भारतीय केंद्राच्या कार्यकारी मंडळाचे ते अनेक वर्षें सभासद होते. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे ते इ. स. १९२२, १९२६, १९२८ व १९३७–३९ या वर्षीं सदस्य होते. मुंबईंतलें 'वाङ्मय सेवा मंडळ' ही संस्था त्यांनीच स्थापन केली होती व हें मंडळ म्हणजे अळतेकर असें समीकरण होण्याइतके त्या संस्थेशीं ते एकरूप झाले होते. मंडळाच्या वतीने एखादें व्याख्यान ठरलें म्हणजे तें व्हायचेंच. मग त्याला एक प्रो. अळतेकर व दुसरा वक्ता असे दोघेच हजर असले तरी कार्यक्रमांत खंड पडत नसे! या मंडळाचें कार्य त्यांनी कित्येक वर्षें कॉलेजांतून सेवानिवृत्त होईपर्यंत चालविलें होतें. जें काम अंगावर घ्यायचें तें चिकाटीने, सचोटीने आणि निःस्पृहपणाने करावयाचें ह्या त्यांच्या गुणां-मुळेच अनेक संस्थांत ते मानाने राहिले. मुंबई मराठी साहित्य संघाच्या कार्यकारी मंडळांतहि सुरुवातीला कांही वर्षें ते होते. त्यांचें व्यक्तिमत्त्वच एवढें स्वाबशील असे की त्यांच्याबद्दल कोणालाहि आदरयुक्त भीति वाटावी.

मुंबई विद्यापीठांत मराठीला मानाचें स्थान नव्हतें, अशा वेळीं ते विल्सन कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक झाले. विद्यापीठांत मराठीला प्रतिष्ठा मिळविण्याच्या मार्गांत अडथळा

होता, तो इंग्रजीचा नव्हे, तर संस्कृतच्या पुरस्कर्त्यांचा, ही मोठी खेदनजक गोष्ट होती. मानाचें स्थान मिळविण्यासाठी मराठीला दीर्घकाल झुंज द्यावी लागली. अशा परिस्थितींत प्रो. अळतेकरांनी मराठीची प्रतिष्ठा वाढविण्याचें कार्य केलें; आणि त्यांच्या अध्यापनाच्या अवधींतच मुंबई विद्यापीठांत मराठीला तिचें योग्य तें स्थान मिळालें, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट म्हटली पाहिजे.

गेल्या ५० वर्षांत महाराष्ट्रांत जीं राजकीय, सामाजिक, शैक्षणिक व साहित्यिक आंदोलनें झालीं तीं प्रो. अळतेकरांनी जवळून पाहिलीं. कांहींत त्यांनी प्रत्यक्ष भागहि घेतला. अनेक महत्त्वाच्या व्यक्ति आणि घटना त्यांच्या निकट परिचयाच्या होत्या. त्यांनी प्रवास पुष्कळ केलेला होता. त्यांच्या डोळ्यांत मिस्किलपणाची चमक आणि ओठावर मिस्किल स्मित हीं सतत असत. त्यामुळे त्यांच्या गप्पा ऐकणें ही एक मेजवानीच असे. मेजवानीच्या ओघानेच आलें म्हणून लिहितों की, मेजवानी जिलबीची अगर बासुंदीची कसलीहि असो, ती शेवटचा पांढरा भात वाढायला आल्याशिवाय त्यांना अपुरी वाटे! पांढरा भात हें त्यांच्या रुचीचें एक वैशिष्ट्य होतें.

कोणत्याहि प्रश्नाचा स्वतंत्र बुद्धीने, निर्भीडपणें, कोणाचीहि तमा न बाळगतां, चौकसपणें विचार करणें हा त्यांच्या वृत्तीचा विशेष होता; आणि हीच चौकस आणि सत्यान्वेषी वृत्ति, ज्यांना त्यांच्यापाशीं शिकण्याची संधि मिळाली त्यांना आठवल्याशिवाय राहणार नाही.

विचारांनी प्रागतिक आणि वृत्तीने जहाल असे प्रो. अळतेकरांचें वर्णन करतां येईल. त्यांनी ललितां, मुक्तबंध, शान्ताराम इत्यादि कादंबऱ्या तसेंच कालिदासाची सृष्टि, ज्ञानेश्वर, तुकाराम इत्यादि समालोचनात्मक ग्रंथ लिहिले; पण त्यांच्या सर्व ग्रंथांत "गोपाळ गणेश आगरकर : चरित्रात्मक निबंध" हा ग्रंथ विशेष उठून दिसत राहील. कारण त्यांचे सर्व स्वभावविशेष या ग्रंथांतच एकत्र व्यक्त झालेले आहेत.

जीवनांत चारित्र्याला ते फार महत्त्व देत. त्यांचें वागणें त्यामुळेच अत्यंत निःस्पृह व बाणेदार होतें. ते आतिथ्यशील होते. प्रो. अळतेकरांच्या मृत्यूमुळे महाराष्ट्राच्या गेल्या दोन पिढ्यांच्या कालखंडांतला एक खंदा पुरुष नाहीसा झाला आहे. ● ● ●

कै. माधव दामोदर अळतेकर

# आगरकर-डे : १ जुलै १९१६

[ नुकतेच दिवंगत झालेले कै. मा. दा. अळतेकर यांनी ' उलटलेलीं पानें ' या नांवाने आपलें आत्मवृत्त लिहून ठेविलेलें आहे. तें अप्रसिद्ध आहे. त्यांतील कांही पानें येथे उद्धृत करावयास त्यांचे चिरंजीव डॉ. मनोहरपंत अळतेकर यांनी परवानगी दिल्या-बद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें. तरुण अळतेकरांच्या व्यवस्थापन-कौशल्यावर या पानांतून चांगलाच प्रकाश पडतो--संपादक, म. सा. पत्रिका. ]

" एके दिवशीं मी आणि वाघ संध्याकाळीं बोलत बसलों होतों. बोलतां बोलतां समाजसुधारणेचा विषय निघाला. वाघ हे कर्ते-सवरते सुधारक होते. ते म्हणाले- ' ज्याने सुधारणेचा सर्वांगीण पुरस्कार केला आहे अशा एखाद्या माणसाचें नांव आपण समाजापुढे आणलें पाहिजे. तो पुरुष मोठा धीर-वीर असावा, राजकारणांतहि तो पुढचा असावा आणि समाजकारणांतहि तो पुढचा असावा. ' मी त्यांना लागलीच गोपाळ गणेश आगरकर यांचें नांव सांगितलें. त्यांना तें पूर्णपणें पसंत पडलें. ते म्हणाले- ' आगरकरांसारखा निर्मळ सुधारक दुसरा झालेला नाही. आपण आगरकरांचा कांहीतरी उत्सव करावा. ' पुढे आणखी दोन-तीन वेळां बोलणें झालें व आमचा बेत कायम झाला. ते दिवस मार्च महिन्याचे ( १९१६ ) होते. आम्ही ही गोष्ट नंतर नारायणराव जोशांच्याकडे काढली. त्यांना ती पूर्ण पसंत पडली. नंतर एकदा गोटस्करांच्याकडे बोललों. त्यांनाहि ती गोष्ट मान्य झाली. आगरकर ता. १७ जून १८९५ रोजीं मरण पावले होते.

तेव्हा त्या दिवशीं जमेल तर नाही तर त्यानंतर जितक्या त्वरित जमेल तेव्हा त्यांची पुण्य-तिथि सार्वजनिक समारंभानें साजरी करावयाची असें आम्हीं ठरविलें. लागलीच आमची सात-आठ जणांची कमिटी झाली. त्यांत मला चिटणीस नेमण्यांत आलें व माझ्याबरोबर काम करण्याला दुसरे चिटणीस रा. रा. वसंत नारायण नाईक यांना विचारलें व त्यांनी तें लागलीच मान्य केलें. मुंबई येथे हाजी कासमवाडींतच वाघ यांनी आपल्या घरीं चहाला सर्व मंडळी बोलाविली आणि मार्च महिन्यांत आमची पहिली औपचारिक सभा झाली. या सभेंत आगरकरांची एकविसावी पुण्यतिथि साजरी करावी असें ठरलें व त्याच वेळीं जाति-भेद आपण मोडला हें प्रत्यक्ष आचरणाने जाहीर करण्यासाठी एक सर्वजातीय एकत्र भोजन करावें असेंहि ठरलें. आगरकरांच्याबद्दल आदर असलेलीं हजारों माणसें होतीं. त्यांपैकी कांही जणांना तरी त्या दिवशीं बोलावयाची विनंती करावी असेंहि ठरलें. अध्यक्षस्थान फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल परांजपे यांना देण्याचें ठरलें व सर नारायण चंदावरकर यांनी स्वागताध्यक्ष व्हावें असें ठरलें. अशा प्रकारें आमच्या पहिल्या सभेंत काम तर उत्कृष्ट झालें व वाघ आणि मी कामाला लागलों.

वसंतराव आतां 'आगरकर सेलिब्रेशन कमिटी'चे माझ्याबरोबर चिटणीस झाले. पुढे मी सर नारायणराव चंदावरकरांना जाऊन भेटलों व त्यांना आम्ही आगरकर-दिन साजरा करण्याचें ठरविलें आहे असें सांगितलें. सर नारायणरावांची माझी ओळख होऊन वर्षे

झालें होतें. त्यांना माझ्यासारख्या लहान माणसाबरोबर सुद्धा बोलणें-चालणें आवडत असे. त्यांनी आम्हीं काढलेल्या कल्पनेचें अभिनंदन केलें व आमच्या कमिटीचे अध्यक्ष होण्याचें तत्काळ कबूल केलें. मीं त्यांना विचारलें—'आगरकरांचे जे स्नेही असतील त्यांनाहि या समारंभाचें आमंत्रण द्यावयास नको काय ?' नारायणराव लागलीच म्हणाले–'त्यांना अवश्य बोलाविलें पाहिजे.' तेव्हां मी टिळकांचें नांव घेतलें. नारायणराव म्हणाले—'टिळकांना अवश्य बोलाविलें पाहिजे. टिळकांनी या समारंभाला हजर राहणें फारच योग्य होईल.' पुढें एप्रिल-मे महिन्यांत सर नारायणराव लोणावळा येथे राहावयास गेले. त्यांच्याशीं माझा पत्रव्यवहार असे. त्यांनी लोणावळ्याहून पत्रांत मला लिहिलें–'तुमची टिळकांना बोलावण्याची कल्पना योग्य आहे. टिळक आणि आगरकर दोघांनीहि आपापल्या मताबद्दल सरकारी रोषाची पर्वा केलेली नाही. दोघेहि मोठे निःस्वार्थी आणि देशभक्त यांत शंका नाही.' हें पत्र पुढे मी समारंभ आटोपल्यावर पांचसहा महिने गजजवळ ठेवलें होतें. मुंबईत डॉ. मॅकीकन यांची परवानगी घेऊन विल्सन कॉलेजचा हॉल समारंभाला ठरविला व समारंभाची तारीख २ जुलै १९१६ ही निश्चित केली. या वेळीं रा. काशीनाथपंत मित्र मला म्हणाले की, आपण मनोरंजनाचा खास अंक या समारंभासाठीं काढतों. तुम्ही त्याची तयारी करून दिली पाहिजे. मीं होय म्हटलें व लागलीच कांहीं मंडळींशीं पत्रव्यवहार सुरू केला. रँग्लर परांजप्यांची अध्यक्ष होण्यासाठी संमति मिळविली. रावबहाद्दूर महाजनींना पत्र लिहून त्यांचा आगरकरांवर लेख मागितला. प्रो. भाटे, नाशिकचे रा. रा. रामचंद्र गणेश प्रधान, बॅरिस्टर जयकर वगैरे मंडळींना भाषणें करण्याची विनंती केली व ती त्यांनीं तावडतोड मान्य केली. मी आगरकरांचें एक छोटें चरित्र मराठींत लिहिलें व वसंतराव नाईक यांनीं एक लहानसें चरित्र इंग्रजींत लिहिलें. मनोरंजनाच्या खास अंकाची तयारीहि चालली होती.

पुढे मीं टिळकांना पत्र लिहिलें. मी जरी आज नेमस्त पक्षांत असलों तरी ज्या वेळीं आगरकर वारले त्या वेळीं माझा जन्म नुकताच झालेला होता. त्या वेळीं जे तंटे-बखेडे महाराष्ट्रांत झाले ते माझ्या दृष्टीने ऐतिहासिक स्वरूपाचे होते. माझा त्यांच्याशीं कसलाहि संबंध नव्हता. त्या वेळीं ज्या व्यक्ति राजकारणांत किंवा समाजकारणांत गाजल्या त्या सर्वच आपल्याला पूज्य आहेत. त्या व्यक्तींत मतभेद असले तरी त्या सर्व देशसेवक होत्या. याच दृष्टीने मी टिळक आणि आगरकर यांच्याकडे पाहत होतों. तें टिळकांना मीं कळविलें आणि त्यांच्यांत व आगरकरांत कांहीहि मतभेद असले तरी दोघेहि थोर देशसेवक आपण मानतों व यासाठी त्यांच्या पुण्यातिथि-उत्सवाला त्यांच्या वेळचे आणि त्यांचे मित्र म्हणून आपण आलें पाहिजे व आपल्या मुखाने त्यांच्याबद्दल चार शब्द ऐकण्याची आपली अतिशय इच्छा आहे हें मीं टिळकांना कळविलें व स्वागतसमारंभाचे अध्यक्ष नामदार सर नारायणराव चंदावरकर यांनीहि आपणांस बोलाविण्यास सांगितलें आहे म्हणून लिहिलें. ता. २ जुलै रोजीं ही सभा भरणार आहे त्या वेळीं आपण अवश्य हजर रहावें आणि नंतर भोजन-समारंभ होणार आहे त्याला आपण उपस्थित व्हावें असें मीं त्यांना कळविलें. पांचसहा दिवसांनी एका कार्डावर त्यांचें उत्तर आलें. त्यांत त्यांनी लिहिलें—'आपण समारंभ करीत आहांत ही गोष्ट चांगली आहे. मी त्या रविवारीं मुंबईत असलों तर आपल्या समारंभाला येईन. पण मी त्या दिवशीं मुंबईत असण्याचा संभव नाही.' हें उत्तर आम्ही सर्वांनी–सर नारायणराव धरून–वाचलें व सर्वांच्या सूचनेवरून मीं पुनः त्यांस रविवारीं सवड काढून आलेंच पाहिजे म्हणून कळविलें व पुढील तयारीला लागलों. आम्ही दोन तारखेचीं आमंत्रण-

पत्रें काढलीं व सुमारें सातशे-आठशें लोकांना तीं पाठविलीं. आमंत्रण-पत्राबरोबर सभा-गृहांत दाखल होतांना दाखविण्याचें एक कार्डहि मुद्दाम घातलें होतें. टिळक येतील ते एकटे येणार नाहीत हें आम्हांला माहीत होतें.

गेलीं दोन-तीन वर्षें रा. राम गणेश गडकरी आणि मी यांची चांगली दोस्ती झाली होती व त्यांचें पहिलें नाटक प्रेमसंन्यास पाहण्यासाठी मी पुण्यांत त्यांच्याबरोबर गेलों होतों व आम्ही माडीवरून तें नाटक पाहिलें. माझ्या वाङ्मयात्मक मित्रासंबंधी मी पुढे लिहिणार आहे. तेव्हा त्यांच्याबद्दल विशेष लिहीन. सध्या त्यांचें नांव निघण्याचें कारण ता. १ जुलैला शनिवारीं रात्रीं ( १९१६ ) त्यांच्या 'पुण्यप्रभाव' नाटकाचा पहिला प्रयोग होता. तो पाहण्यासाठी त्यांनी मला आग्रहाने—अगदी अत्याग्रहाने बोलाविलें. मी तास-दोन तास येईन म्हणून कबूल केलें. आमच्या समारंभाची तयारी विल्सन कॉलेजांत आणि मुझफराबाद हॉलमध्यें चाललीच होती. तिकडे एक फेरी मारून मला वाटतें रात्रीं जेवण न करतांच मी गडकऱ्यांबरोबर नाटकाला गेलों. नाटकगृहांत माझे मित्र वसंतराव नाईक, गणपतराव कुंभोजकर वगैरे मंडळी हजर होतीच. वसंतराव आणि गणपतराव थोडेसे मागच्या खुर्चीवर होते व मी आणि गडकरी पुढच्या खुर्चीवर होतों. आम्ही गेलों तों नाटकाला सुरवात होणार होती. त्यामुळे खुर्चीवर बसलों आणि पडदा उघडला. नाटकास सुरुवात छान झाली. मग पहिला अंक संपल्यावर माझ्याकडे वसंतरावाशेजारींच अच्युतराव कोल्हटकर 'संदेश'चे संपादक बसले होते, त्यांजकडून चिठ्ठी आली. चिठ्ठींत लिहिलें होतें—' टिळक येथें आले आहेत. उद्या तुमची सभा मोडून टाकण्याचें ठरविलें आहे. तुम्ही होऊन सभा करणार नाही तर उत्तम होईल.' मी त्याच चिठ्ठीवर लिहिलें — ' टिळक आलेत ही फार आनंदाची गोष्ट आहे. आमची सभा होण्याची पूर्ण तयारी झाली आहे. आम्ही आगरकरांचे भक्त आहोंत, रानड्यांचे नव्हे. त्यामुळे सभा न करण्याची बात आमच्या बाबतींत बोलण्यांत अर्थ नाही. ' चिठ्ठी अच्युतरावांच्याकडे पाठविली: ते माझ्याकडे पाहतच राहिले. रविवारीं सकाळीं आम्ही 'संदेश'चा अंक उघडून वाचला. त्यांत आगरकर—दिन मोडून टाकण्याबद्दल उठावणी होती.

उद्याचा प्रसंग कठीण आहे हें मीं ओळखलें. टिळक उद्या काय करतील याची मला कल्पना करवेना. पण आपली सभा उत्कृष्टपणें पार पाडावयाची हा माझा निश्चय होता. दुसरा अंक संपतांच मी गडकऱ्यांचा निरोप घेतला व मला वाटतें वसंतराव नाईक आणि गणपतराव कुंभोजकर यांच्याबरोबर बाहेर पडलों. रात्रीचे अकरा वाजले होते. मुझफराबाद हॉलमध्ये आमची दुसरी कित्येक मंडळी होती. तिकडे मग आम्ही गेलों व तेथे आत्मारामपंत वाघ वगैरे मंडळी होती त्यांना थिएटरांत झालेली हकीगत कळविली. सभा ठरल्याप्रमाणे पार पाडावयाची आम्हीं ठरविलें. टिळकांना आम्ही आमंत्रण देऊन बोलाविलें होतें त्याप्रमाणे ते आले हें चांगलें झालें असेंच आम्हांला वाटलें. आता त्यांनी कांही गडबड करण्याचा प्रयत्न केला तर त्यालाहि आपण तोंड दिलें पाहिजे हें आम्हीं ठरविलें आणि दुसरे दिवशीं सभेची वेळ जरी संध्याकाळीं पांच वाजतांची होती तरी सर्वांनी तेथे चार वाजतां किंवा त्याच्यापूर्वींहि यावें असें मीं सुचविलें व तें सर्वांना मान्य झालें. मग मी घरीं गेलों व स्वस्थपणें झोपलों. रविवारीं सकाळीं जागा होऊन उठलों, स्नान वगैरे केलें आणि बाहेर पडून कांही मित्रमंडळींना भेटून आलों. विल्सन कॉलेजांत खुर्च्या मांडण्याची व्यवस्था हॉलमध्ये केली होती. सर्व मंडळी सकाळीं भेटली. त्यांना तिकिटाशिवाय कोणालाहि

हॉलच्या आंत सोडावयाचें नाहीं म्हणून बजावलें. समारंभाला पुष्कळशा-शंभर तरी नक्की-स्त्रियाहि यावयाच्या होत्या. त्यांची व्यवस्था पाहण्यासाठीं माणसें नेमलीं. दुपारीं मी कसा-बसा जेवलों आणि तीन वाजतां कपडे करून विल्सन कॉलेजांत गेलों. कॉलेजांत गेल्यावर डॉ. मॅकीकन हे कॉलेजांतून बाहेर गेलेले पाहिले. चार वाजल्यापासून मंडळी यावयास लागली. नारायणराव चंदावरकरसुद्धा सव्वाचार वाजतां आले. टिळक सभेला कधीं जन्मांत वेळेवर गेलेले नव्हते; पण आज तेहि सव्वाचार वाजतां आले. त्यांच्यामागून त्यांचे पांचशे-सहाशे अनुयायी आले. मीं त्यांचें जाऊन स्वागत केलें.

ते आपल्यामागून आलेल्या गर्दीकडे पाहत मला म्हणाले, 'अहो, अळतेकर, तुमचा हॉल तर लहान दिसतो. ही इतकी मंडळी कोठें बसणार ?' मी म्हणालों— 'हॉलमधील सर्व जागा तिकिटवाल्या मंडळींनीं भरल्या आहेत. बाकीची इतकी मंडळी येणार अशी कल्पना असती तर मोठा हॉल किंवा एखादें थिएटर घेतलें असतें. आता तें अर्थात् शक्य नाही. आपण आंत तर चला. आगरकर-दिनाला गर्दी झाली तर तें चांगलेंच आहे. आंत चंदावरकर आणि परांजपे आहेत. त्यांच्या सल्ल्यानें काय करावयाचें तें ठरवूं !' मग टिळक एकदाचे आंत आले. त्यांच्याबरोबर त्यांचे चार-पांच रक्षक म्हणून ज्यांना आम्ही समजलों होतों त्यांनाहि आंत नेऊन बसविलें. सी. आय्. डी. चीं माणसेंहि येऊन बसलीं. बाहेर गर्दी सारखी वाढत होती. आंत हॉलहि चिकार भरून गेला. टिळक मला म्हणाले— 'अळतेकर, बाहेरचीं माणसें बसण्याची सोय झाली पाहिजे. नाहीतर सभा होण्यांत अर्थ नाही.' मी त्यांना एका खुर्चीवर बसविलें आणि त्यांना म्हणालों— 'आगरकर-दिनाच्या निमित्ताने एवढी गर्दी जमली. आनंदाची गोष्ट आहे. आम्हांला फक्त या हॉलची परवानगी मिळाली आहे. तो तर गच्च भरलेला आपण पाहताच. आता बाहेर मंडळी आहेत ही गोष्ट खरी. पण त्यांनी शांतपणें उभें राहिलें पाहिजे. या सभेला एवढी गर्दी झाली यांत आम्हांला आनंदच आहे.' टिळक कांही वेळ स्तब्ध होते. मग ते म्हणाले—'बाहेर एवढी गर्दी जमली आहे ती आंत घेण्याची व्यवस्था झाली पाहिजे.' मीं म्हटलें— 'काय करतां येईल तें मी पाहतों. पण एवढी गर्दी आंत घेणें शक्य नाही. बाहेरची मंडळी शांतपणें राहतील तर यांतूनहि कांही उपाय निघेल. तेव्हा आता आपल्याला विनंती की आपण या सभेंत भाषण करावें.' टिळक म्हणाले— 'तुमचे दहा वक्ते आहेत. मला आज पुष्कळ वेळ पाहिजे.' मीं विचारलें— 'आम्ही जास्तींत जास्त अर्धा तास आपणांला देऊं.' टिळक म्हणाले— 'अर्ध्या तासानें काय होणार ! आज मला चांगले दोन-तीन तासहि पुरणार नाहीत.'

मीं त्यांना म्हटलें— 'आपण म्हणतां तें मला बरोबर वाटतें. पण आपण आज नक्की येणार असें आम्हांला कळवलें असतें व आपण दोनतीन तास बोलणार असेंहि सांगि-तलें असतें तर आम्हीं आपलेंच भाषण फक्त ठरविलें असतें. पण आपण येऊं शकणार नाही असें मला कळविलेंत हें खरें ना ?' त्यावर टिळक म्हणाले— 'तें खरें आहे. तेव्हा मी मुंबईला आज येऊं शकेन असें मला वाटलें नव्हतें. पण आता मी आलों आहे.' मी म्हणालों— 'आपण आलांत त्यामुळे आम्हां सर्वांना अतिशय समाधान वाटतें व इतर कांही भाषणें बंद करून आपलें भाषण अर्धा-पाऊण तास होण्याची व्यवस्था करायलाहि मी तयार आहें. आम्ही आपल्याला भक्तिभावाने बोलाविलें, आपणहि आलांत ही आनंदाची गोष्ट आहे. परगांवाहून बरेच वक्ते आले आहेत. त्यांनाहि बोलावयास दिलें पाहिजे.' 'मग तुमचें म्हणणें काय ?' मी म्हणालों— 'आपण स्वस्थ येथें बसा. या समारंभांत आपला अपमान

करावा अशी निदान आमची इच्छा नव्हती किंवा नाही.' टिळक म्हणाले—'तें मला मान्य आहे. मी तुम्हांला न कळवितां आलों ही गोष्ट खरी आहे. पण आता ही बाहेर गर्दी माजली आहे तिचें काय करावयाचें?' मीं म्हटलें—'तें आतां आपण पाहूं.' इतक्यांत बाहेर ओरडा सुरू झाला व हॉलच्या कांही खिडक्या पण फुटल्या. शेवटीं असें ठरलें की आंत एक व बाहेर एक अशा दोन सभा एकाच वेळीं भरवाव्यात व बाहेरच्या सभेपुढे टिळकांनी आमच्या म्हणजे उत्सवमंडळाच्यातर्फे म्हणून बोलावें. टिळकांनी सुदैवानें ही सूचना मान्य केली. मग टिळक रा. दळवी वकिलाबरोबर बाहेर गेले व बाहेरच्या सभेपुढे त्यांनी भाषण केलें. भाषण करण्यापूर्वी 'गर्दी फार झाल्यामुळें बाहेर सभा भरविणें निश्चित करावें लागलें. आतां मी आगरकर-डे कमिटीच्यातर्फें आपल्यापुढे भाषण करणार आहे' असें टिळकांनी स्वच्छ सांगितलें.

टिळकांचें बाहेरच्या सभेंत आमच्यातर्फे भाषण सुमारें दीड तास झालें. हॉलमधील सभाहि सुमारें अडीच तास उत्तमपणें व शांतपणें चालली. रँग्लर परांजपे यांनी उत्कृष्ट भाषण केलें. याशिवाय बॅरिस्टर जयकर, रा. रा. रामचंद्र गोविंद प्रधान, प्रो. गोविंदराव भाटे, श्रीमती वेणूबाई नामजोशी वगैरे वक्त्यांचींहि उत्तम भाषणें झालीं. सर्व समारंभ मोठ्या उत्कृष्टपणें पार पडला. बाहेर टिळकांचें भाषण संपल्यानंतर मी त्यांचे जाऊन आभार मानले व रात्रीच्या जेवणाचें आमंत्रण दिलें. आपण जेवायला येणार नाही म्हणून त्यांनी सांगितलें. सभेचें सर्व काम उत्तम झालें व आलेल्या प्रसंगांतून सभा निभावली याबद्दल सर्वांनी संतोष प्रदर्शित केला. सभा संपल्यानंतर मुझफराबाद हॉलमध्ये मंडळी गोळा झाली व रात्रीं नऊ वाजण्याच्या सुमारास निरनिराळ्या धर्मांची आणि सर्व हिंदुजातींची मंडळी एकत्र बसून जेवलीं. सर नारायणराव चंदावरकर, रँग्लर परांजपे वगैरे सर्व मंडळी जेवणास उपस्थित होती आणि जेवणाचा बेतहि फार उत्तम होता. गुजराथी खाजा आणि आमरस हें पक्वान्न होतें आणि भोजन-समारंभ तास-दीड तास सुखानें झाला. भोजनास आलेल्या मंडळींचीं नांवें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालीं. सर्व जातींचा व धर्मांचा हा एकत्र भोजनसमारंभ म्हणजे मुंबईंत अपूर्व होऊन गेला. कांही थोड्या लोकांनी (चार किंवा पांच असतील) आपलीं नांवें प्रसिद्ध करूं नयेत म्हणून अगदी गयावया करून सांगितलें. त्याप्रमाणे तीं केलीं नाहीत. आगरकर–डे मुंबईंत फार गाजला. प्रत्येक वर्तमानपत्रांत त्यासंबंधीं लेख आले. केसरीनेहि पुढच्या मंगळवारीं अग्रलेख या समारंभावर प्रसिद्ध केला आणि यद्यपि चंदावरकरांना त्या लेखांत उगाच कोपरखळ्या दिल्या होत्या, तरी रँग्लर परांजपे यांची अध्यक्षस्थानीं निवडणूक फार योग्य झाली असें लिहिलें आणि लेखाच्या शेवटीं इतक्या वर्षांनीं का होईना पण हा समारंभ घडवून आणल्याबद्दल चिटणीस रा. वसंतराव नाईक आणि मी यांचें अभिनंदन केलें." ● ● ●

प्रा. सुरेश म. डोळके

# पाठचिकित्सा : कांहीं मूलतत्त्वें

## प्रास्ताविक

कोणत्याहि ग्रंथाच्या शास्त्रशुद्ध अभ्यासाकरिता व ग्रंथकारकालीन स्थिति-गतींच्या अचूक अनुमानांकरिता त्या ग्रंथाची मूळ ग्रंथकाराच्या मुखांतून किंवा लेखणींतून प्रत्यक्ष अवतीर्ण झालेली प्रत उपलब्ध होणें अत्यंत आवश्यक असतें. पण मुकुंदराज, ज्ञानदेव, नामदेव प्रभृति प्राचीन अग्रगण्य ग्रंथकारांच्या ग्रंथांकडे पाहिलें तर त्यांत भाषेच्या दुर्बोधतेमुळे, उच्चार-भेदांमुळे, सांप्रदायिकतेमुळे किंवा स्वतःच्या पदरचे शब्द मूळ ग्रंथकारांच्या नांवावर खप-विण्याच्या प्रतकारांच्या हव्यासामुळे असंख्य अपपाठांचा इतका बुजबुजाट झालेला आढळतो की, मूळ ग्रंथकारांच्या अमृतवाणीचा तिथे मागमूसहि लागू नये! अशा ग्रंथांच्या उपलब्ध होतील तितक्या प्रती साक्षेपाने मिळवून त्यांतल्या प्रत्येक पाठाची भाषाशास्त्रदृष्ट्या, व्याकरणदृष्ट्या, संदर्भदृष्ट्या व विचारदृष्ट्या निखालस छाननी करून, अंतर्गत मूल्यांच्या कसोटीवर, अधिकृत अशा पाठसंहिता तयार केल्याशिवाय मूळ ग्रंथाच्या शास्त्रशुद्ध व बुद्धिनिष्ठ अभ्यासाचा मार्ग खुला व्हायचा नाहीं.

## पाठचिकित्सेचें ध्येय

ग्रंथ जितका लोकांच्या प्रचारांत अधिक, तितकीं त्यांत पाठांतरेंहि जास्त. ग्रंथाच्या प्रचाराबरोबर त्यांतल्या पाठांतरांचें प्रमाणहि वाढतें. या पाठापपाठांच्या जंजाळांतून मूळ ग्रंथ-काराला अभिप्रेत असलेले पाठ निश्चित करणें हेंच पाठचिकित्सेचें ध्येय आहे. खुद्द ग्रंथकाराने स्वतःच्या हाताने लिहिलेली किंवा स्वतःच्या देखरेखीखाली लिहविलेली अथवा इतरांनी लिहिल्यावर स्वतः तपासून शुद्ध केलेली पोथी साद्यन्त उपलब्ध असली तर तिच्या बाबतींत पाठचिकित्सेचा प्रश्न विशेष उद्भवत नाहीं. ' विशेष ' म्हणण्याचें कारण असें की, अशाहि पोथींत लेखकाचे लेखनदोष व त्याच्या नजरचुका असूं शकतात; व पाठचिकित्सकाने अशा उघडउघड दिसणाऱ्या चुका दुरुस्त केल्या पाहिजेत. जिथे ग्रंथकाराच्या हातच्या अस्सल पोथीची ही स्थिति, तिथे त्या पोथीवरून निरनिराळ्या स्थळीं, निरनिराळ्या काळांत, निरनिराळ्या विद्यापीठांकडून, निरनिराळ्या सांप्रदायिकांकडून किंवा एकाच संप्रदायांतल्या निरनिराळ्या व्यक्तींकडून नकलण्यांत आलेल्या व त्या नकलांवरूनहि तयार करण्यांत आलेल्या पोथ्यांत [ Copies of Copies ] पाठभेदांचें रान किती मोठ्या प्रमाणांत माजलेलें असेल याची कल्पनाच केलेली बरी. मूळाची नक्कल ही मूळाइतकी तंतोतंत कधीच राहूं शकत नाहीं. मूळाची नकल जितक्या वेळां अधिक, तितकी त्याच्यांत मूळांतरित पाठांची संख्याहि जास्त.

अशा स्थितींत एखाद्या ग्रंथाच्या उपलब्ध होतील तितक्या प्रती साक्षेपाने मिळवून त्यांतल्या प्रत्येक पाठाची चर्चा करून ग्रंथकाराने मूळांत काय लिहिलें असावें याचें तर्कशुद्ध अनुमान करणें एवढा एकच मार्ग पाठचिकित्सकाला मोकळा असतो.

## संपादकाचा पाठ हा मूळ पाठ असेलच असें नाहीं

ग्रंथकाराचा मूळ पाठ ठरविणें किंवा शास्त्रशुद्ध अनुमानाने मूळ पाठाच्या शक्य तितकें जवळ जाणें हाच पाठचिकित्सेचा सर्वस्व-हेतु आहे. पाठचिकित्सकाला बरोबर वाटणारा किंवा आवडणारा पाठ हा मूळ लेखकाचा पाठ असेलच असें नाही. मूळपाठ भाषेच्या दुर्बोधते-मुळे, संदर्भाच्या अनाकलनामुळे किंवा आणखी कांही कारणांमुळे आजच्या अभिरुचीच्या संपादकाला कदाचित् शुद्ध वाटणार नाही किंवा आवडणार नाही. पण तरीहि त्याने तो बदलविता कामा नये. ग्रंथकाराच्या किंवा ग्रंथकारकालाच्या पाठाला [ उघड उघड दिसणारे लेखनदोष वगळून ] यत्किंचितहि धक्का न लावणें हें त्याचें पवित्र कर्तव्य आहे. त्याने जर तो बदलविला, तर मूळ ग्रंथाची पाठशुद्धि होण्याऐवजी त्यांतल्या अपपाठांच्या जंजाळांत आणखी भर मात्र पडेल; व पाठशुद्धि करायला निघालेला चिकित्सकच त्याला कारणीभूत होईल. अर्थाच्या, व्याकरणाच्या किंवा वृत्ताच्या दृष्टीने एखादा पाठ संपादकाला कितीहि सुंदर व म्हणून स्वीकार्य वाटत असला तरी तो जर मूळ ग्रंथकाराचा नसेल तर, पाठचिकित्साशास्त्राच्या मूलतत्त्वानुसार, त्याज्यच समजला पाहिजे. आजच्या संपादकाच्या चिकित्सक दृष्टीला जें बरोबर वाटेल किंवा आवडेल तें साडेसातशे वर्षांपूर्वी लिहिणाऱ्या मुकुंदराजांना तसेंच वाटलें असेल असें कसें म्हणावें? पाठचिकित्सकाने पाठनिश्चिती करतांना स्वतःच्या दृष्टिकोनांतून पाहण्या-ऐवजी मूळ ग्रंथकाराच्याच दृष्टीने विचार केला पाहिजे. मूळपाठ व्याकरण, भाषा इत्यादि दृष्टींनी आज अशुद्ध वाटत असले तरी पाठचिकित्सकाने ते तसेच कायम ठेवले पाहिजेत. त्यावरून मूळ लेखक शुद्ध लिहीत नव्हता असें सिद्ध झालें तरी हरकत नाही. किंबहुना, मूळ लेखकाच्या प्रतिभेचें व लेखनपद्धतीचें यथार्थ मूल्यमापन करण्यासाठी तसेंच सिद्ध होणें आवश्यक आहे.

## दोनहि प्रकारांचीं रूपें कायम ठेवावीं

शिवाय, ग्रंथकार कितीहि विद्वान् किंवा भाषाप्रभु असला तरी तो आपल्या ग्रंथांत एखादा शब्द किंवा एखादें व्याकरणरूप सर्वत्र एकाच पद्धतीने लिहील असेंहि नाही. राज-वाडे–ज्ञानेश्वरींत 'वो' बद्दल सामान्यतः 'ॐ' आढळतो. पण, 'वो' अगदीच आढळत नाही असें नाही[1]. त्यांच्या ज्ञानेश्वरींत अकारांत पुल्लिंगी नामें सामान्यतः उकारान्त लिहिलेलीं आढळतात. राजवाडे यांनी तर "अपभ्रंशांत नियमेंकरून अकारान्त पुल्लिंगी नामांचें एक-वचन उकारान्त होतें. जुन्या ज्ञानेश्वरींतहि तोच प्रकार प्रायः आढळतो. फक्त, य् आणि व् हे दोन ऊष्मवर्ण व ह् हा महाप्राण ज्या शब्दांचा उपान्त्य असतो त्या शब्दांचें एकवचन ओकारान्त होतें" असा नियमहि केला आहे.[2] पण राजवाडे यांचें हें म्हणणें बरोबर नाही असें त्यांच्याच ज्ञानेश्वरींतल्या कर्मयोग ( ५–१६ ), दीप, प्रकाश ( ८–२७ ), पर्वत, समुद्र ( ६–१८ ), चंद्र (१४–१३), पुत्र ( १५–५९ ) इत्यादि शब्दांवरून व अनुग्रहो, देवो, संशयो, संजयो, कटाहो, विजयो या त्यांनीच नमूद केलेल्या[3] य, व, ह अन्त्य असलेल्या रूपांवरून सिद्ध होतें.

१. राजवाडे–ज्ञानेश्वरी : उपजतसेवो ( ६–६९ ), देवो ( १८–२८३ ), ठावो ( १८–२९२ ) इ.

२. ज्ञानेश्वरींतील मराठी भाषेचें व्याकरण, पृ. ८.

३. ज्ञा. म. भा. व्या., पृ. ८.

अशा वेळीं पाठचिकित्सकाने दोनहि प्रकारचीं रूपें कायम ठेविलीं पाहिजेत. अमुकच रूप बरोबर असें ठरवून ग्रंथकाराचे मूळ पाठ सुधारण्याचा अधिकार त्याला मुळीच नाही. त्यावरून, " ' ओं बद्दल ॐ लिहिण्याच्या बाबतींत ' किंवा ' अकारान्त पुल्लिंगी नामांच्या एकवचनाच्या अन्तीच्या अकाराच्या किंवा उकाराच्या बाबतींत ' ग्रंथकार विकल्प मानीत होता " असें अनुमान अभ्यासकाला काढतां येईल. प्राचीन मराठीच्या बाबतींत अशीं भाषाशास्त्रीय अनुमानें काढतां येणें हा ग्रंथकाराने योजलेल्या अस्सल पाठांचा मोठाच उपयोग होय.

## प्रतकारांच्या चुका होण्याचीं कारणें

मूळ ग्रंथाची नकल करीत असतांना प्रतकारांकडून चुका होण्याचीं अनेक कारणें असूं शकतात. जे. पी. पोस्टगेट[४] व डॉ. हॉल[५] यांनी या चुकांचें वर्गीकरण केलें आहे. मराठी हस्तलिखितांत चुका होण्याचीं कारणें सामान्यत: पुढीलप्रमाणे सांगतां येतील :

( १ ) वर्णलेखनाच्या सारखेपणामुळे होणारा प्रतकारांचा संभ्रम :

मराठी लेखनांत क–फ, त–न, त–व, व–ब, उ–ड, म-भ, घ–ध, स–म, द–ट; ळ–ल इत्यादि सदृश-लेखन-शब्दांच्या चुकीच्या वाचनामुळे अनेक अपपाठ निर्माण होतात. उदा०—प्राहाटिती–त्राहाटिती (ज्ञानेश्वरी, १–१३३), बहुतां–बहुवां ( ४–१५ ), मंदु–मुंदु ( ४–२१७ ), वोळली–बोळली ( १८–१६१ ), स्तंभातेया दोसें–स्वंभावयोद्देशें ( १८–२४४ ), प्रेम टांगा–प्रेम दांगा ( १३–५५६ ), बळें–बोलें ( १७–२६४ ), शस्त्रामी–शस्त्राग्री–शस्त्रास्त्री ( १–२२० ), प्रथम–प्रशम[६] इ.

( २ ) सर्वसामान्य सादृश्यामुळे होणारा शब्दांचा, शब्दावयवांचा किंवा वर्णांचा विपर्यय :

उदा०—सुखें राज्य भोगावें—राज्यसुख° ( ज्ञा. २–४५ ), ओवाळणी—ओलावणी ( ४–२१० ), अपेक्षिजे—आक्षेपिजे ( १८–३६० ), उपमा—उमपा ( १८–३८२ ), वह्याळी—व्याहाळी (१८–५४१), कवडसा—कडवसा ( ४–१७२ ) अवघे—आघवे इ.

४. J. P. Postgate: 'Textual Criticism' [ Ensyclopaedia Britannica, Eleventh Edition, Volume XXVI, Cambridge: 1911 ]

५. F. W. Hall: 'Companion to Classical Texts' [ Oxford, 1913 ]

६. आणखी कांही उदाहरणें : बेंवळ–विठ्ठलु ( ज्ञा. १–१९७ ), सुख–मुख ( ४–८ ), पावला–पातला ( २–८३ ), घडे–घट ( २–२०५ ), सस्वरूप–स्वस्वरूप (२–३४१), बांधिजे–मांडिजे (१८–७३१), फरशु–परशु (१–११), मुखी–मुठी ( १–७४ ), विराली–जिराली ( १८–२२० ), भारती–भासती [ सामराज : रुक्मिणीहरण, ३–३५ ], जयाचा–जपाचा ( रु. ह. ३–७९ ), काचे-वाचे ( रु. ह. ७–१०५ ), द्वंद्ववाटे–°काटे ( रु. ह. ४–७७ ) इ.

( ३ ) संकेत किंवा संक्षेप नीट न उलगडल्यामुळे होणारें चुकीचें वाचन :

महानुभावी वाङ्मय सांकेतिक लिप्यांत बंदिस्त असल्यामुळे सांकेतिक लिप्यांतून बाळबोधींत लिप्यंतर करतांना मूळांतले संकेत अनेकदा नीट उलगडत नाहीत[७] व त्यामुळे अपपाठ निर्माण होऊं शकतात.

( ४ ) वाचनदोष :

उदा०—वसैठ > वसौट, वरिष्ट ( ज्ञा. १–३० ), प्रज्वलल्लेनि > प्रज्वलोनि ( १–२४२ ), आदि पाहिं > अति दियाही ( २–६ ), देह चि न नशे > देहचिन्ह नाशे ( २–१०९ ), धर्मांचि > धर्माचें ( ४–५४ ), भवनोद्भवारंभस्तंभ > भवनोद्भवनारस्तंभ ( १८–६ ), निषिद्धसि सर्वत्र जूझें > नेघती सर्वत्र दुजें (१८–१३३), आत्मज्ञानविखीं > आत्मज्ञानविषइकी ( १८–१५२ ), तीर्थें ये सावाया > तीर्थे सेवावया ( १८–१५८ ) इ.

( ५ ) शब्द चुकीचे जोडणें वा तोडणें:

शब्द बरोबर जोडून वा तोडून त्यांचें नीट वाचन न केल्यामुळे अनेक अपपाठ व अर्थपरंपरा निर्माण होतात. उदा०—रुंखजात–रुंख जात ( ज्ञा. ४–९६ ), परिवरीं–परि वरीं ( ९–१२७ ), अरिमित्र–अरि मित्र ( ९–१६५ ), गातयाचेनि–गा तेयाचेनि ( १८–१७१५ ), बोलरंगें–बोल रंगें ( १८–१७१५ ), प्राणियां चांपडे–प्राणियाचां पडे ( १५–५५ ), पार्था सिचडी–प्रार्थासि चडि ( १४–२८६ ), न लगे–नल गे ( द. स्व. ), वाढवीलें किं–वाढवी लेंकि ( सामराज, रु. ह. २–४३ ), बहुलक्षणांनी–बहुल क्षणांनी ( रु. ह. २–४५ ), नितंबा गरिमान यावा–नितंबा गरिमा न यावा ( रु. ह. २–५३ ), ईंज लाहे बुजावी–ईजला हे बुजावी ( रु. ह. २–१०८ ), पावेंन पक्षपातें–पावे न पक्षपातें ( द. स्व. ).

( ६ ) जुन्यावद्दल नवें शुद्धलेखन व जुन्या शब्दांचें आधुनिकीकरण :

नकल करीत असतांना मूळांतल्या शुद्धलेखनाला व शब्दांना आधुनिक स्वरूप देण्याकडे प्रतकारांचा कल होतो व त्यामुळेहि पाठभेद संभवतात. उदा०—जाहलें > झालें, गोठी > गोष्टी, सांघावें > सांगावें, जऱ्ही > जरी, निफज > निपज, सूटिजे > सुटिजे, दूजें > दुजें, येकवंकि > एकवंकि, योकडे > थोडे (ज्ञा. १–११२), जिंतिला > जिंकिला (१–२००), लाहिजे > लाभिजे (२–३८), खाल > साल (३–२५२), निदैलेया ही वरी > निजलेयाहि वरी ( १८–२२३ ), तेव्हलि > ते वेळीं ( १–२३ ), दुवाडपण > द्वाडपण इ.

( ७ ) अर्थबोध न झाल्यामुळे बदलणारे शब्द व निर्माण होणारे अपपाठ :

प्राचीन भाषेच्या दुर्बोधतेमुळे प्रतकार कधी कधी मूळ पाठांना तिलांजलि देतात व त्यांच्याऐवजी स्वतःला सुबोध वाटतील असे पाठ मूळांत योजून अर्थविशदीकरणाचें काम कसेंतरी उरकून घेतात. उदा० — चिंतारत्न > चिंतामणी रत्न ( ज्ञा. १८–२८० ), अनुपायनी > अन्नपानी ( १८–३३१ ), भुवा जावो > येवजावो ( १८–४१८ ), प्रणवाची > अन्नपानाची ( १८–३३६ ), कर्माची सुणी > कर्मकेरसुणी ( १७–६४ ), लवंधा सूटे > लवंधा सुंठे ( १७–१४८ ), वुद्धियोगे ओजले > वुद्धियोगा योजिले ( २–२७७ ), सेवितां हों तें > सावियां होती ( ६–१३४ ), हेतु ही सवंघडे > हेतुस्तव घडे ( १८–३०३ ).

७. बाळकृष्ण महानुभाव शास्त्री यांचा लेख; महाराष्ट्र–साहित्य–पत्रिका, एप्रिल १९३७.

( ८ ) वाचनदोषांप्रमाणेच प्रतकारांच्या लेखनदोषांमुळेहि ग्रंथकाराचे मूळ पाठ बदलतात :

उदा०—गुरुवतीचा > गरुवतीचा ( ज्ञा. १–३३ ), हलुवारपण > हळवारपण ( १–५७ ), सुतेजपणें > सतेजपणें ( १–१२६ ), मारावे > मरावे ( १–२३८ ), तारिलों > तारिला ( १–२२ ), तिमिराविरुद्ध > तिमिरावरुद्ध ( २–५६ ), सिद्धसारस्वती > सिद्धसरस्वती ( १–७८ ), कामक्रोधविहीनु > कामक्रोधाविहीन ( २–३३४ ), अंगवाहीन > अंगहीन, कलातीत > कालातीत ( १८–३ ), माधुर्या > माधुर्यी (१–३६), गजघंटांते > गजघटांतें ( १–९२ ), सांदुकला > सादुकला (१–९०), बेंथु > बेथु इ.

[ अ ] बरेचदा लेखनदोषांचा उगम प्रतकारांच्या उचारपद्धतींत असतो :

उदा०—( वर्णागम ) वर्षाव > वरिषाव (ज्ञा. २–२३२), दानवर्या > दानवरिया, सकळ > सकळां ( १–२८ ), प्रियसंगम > प्रियासंगम ( १८–३४३ ), चमतिकारू, प्रतिस्फळे, ततक्षणिं इ.

( वर्णलोप ) नाशे > नशे ( ज्ञा. ४–४४ ), हान > हन ( ४–११२ ), लागे > लगे, आश्रद्ले > अश्रद्ले ( १–४५ ), विशेषे > विशेष (१–२२ ), अति असो > आतिसो, येर येर > येरेरे ( १–२०७ ) इ.

( समवर्णलोप ) वाद्ययंत्र > वाद्यंत्र, भववर्नीं > भवर्नीं इ.

[ ब ] प्रतकाराचें लक्ष, नकल करीत असतांना, अक्षरापेक्षा शब्दावर खिळलेलें असल्यामुळे त्याचे शब्दांच्या उच्चारांतले दोष त्याच्या लेखनांतहि आपोआप उतरतात.

( ९ ) नकल करीत असतांना प्रतकाराच्या व्यग्रतेमुळे समोरच्या प्रतींतला मूळ मजकूर वेगळा व प्रतकाराच्या मनांतला विचार वेगळा असें होऊं शकतें. असें झालें तर प्रतकार आपल्या मनांतील विचारानुसार लेखन करील व समोरच्या प्रतींतला मूळ मजकूर बाजूलाच राहील. मूळांतला मजकूर, बुद्धिभेदामुळे, प्रतकाराला जर वेगळ्या अर्थानें प्रतीत झाला, तर तो मूळाऐवजी स्वतःला प्रतीत झालेल्या अर्थाचाच मजकूर आपल्या प्रतींत लिहिणें शक्य आहे. प्रतकाराची दृष्टि व त्याची बुद्धि, तो ज्या ग्रंथावरून प्रत करीत असेल त्यांतल्या अक्षराअक्षरावर खिळलेली असली पाहिजे.

( १० ) विशेषनामें व पारिभाषिक शब्द यांच्या वाचनांतील संदिग्धता :

प्रतकारानें नकल करीत असतांना विशेषनामें व पारिभाषिक शब्द यांचें लेखन, मूळ प्रतींतील लेखनाबरहुकूमच केलें पाहिजे. मुक्तेश्वरी महाभारताच्या प्राचीन प्रतींत जन्मोजय[८], बृहन्नळा[९], भिमसेन[१०], याज्ञसेनी[११], धनंजेय[१२] अशा अपभ्रष्ट स्वरूपांत विशेषनामें लिहिण्याची लकब आढळते.[१३] प्रतकारांनीहि ती तशीच कायम ठेविली पाहिजे.

८. मुक्तेश्वर : विराटपर्व, १–१२८.
९. विराटपर्व, १–१६, २–१३, २–१५.
१०. विराटपर्व, १–९४.
११. विराटपर्व, १–११७.
१२. विराटपर्व, २–५५.
१३. वासुगि, मोनिका, पातांजळ, जयमिनि [ आदिपर्व ].

( ११ ) अबोधपूर्व चुकांचें निवारण करण्याची प्रवृत्ति :

कांही प्रतकार आपल्या हातून अजाणता झालेल्या चुकांचें निवारण करण्याकरितां दुसरे शब्द योजतात. त्यामुळे अपपाठ तर निर्माण होतातच, पण मूळांत नसलेली वाक्येची वाक्यें अस्तित्वांत येतात व नंतरचे प्रतकार, तो मूळ ग्रंथाचाच भाग समजून त्याचा मूळांत अंतर्भावहि करतात.

**अ व क्षे प** [ Omissions ]

( १ ) लेखन-सादृश्यामुळे वर्ण, शब्दावयव, शब्द किंवा ओळी गळणें—सारखे शब्द किंवा शब्दसमूह जेव्हा जोडीजोडीने लिहिलेले असतात तेव्हां त्यांची नकल करतांना प्रतकारांकडून कधी कधी त्यांतला एक सुटून जातो.

( २ ) मूळ ग्रंथाला आटोपशीर किंवा संक्षिप्त स्वरूप देणें.

( ३ ) दुर्बोध शब्द वा उतारे गाळणें—प्रतकाराला मूळ शब्द नीट वाचतां आला नाही किंवा त्याचा अर्थ नीट उलगडला नाही तर तो गाळून टाकण्याकडे किंवा तितकी जागा मोकळी सोडण्याकडे त्याची प्रवृत्ति होते. मोकळी राहिलेली जागा नंतरचे प्रतकार स्वतःला सुचतील ते शब्द घालून भरून तरी काढतात किंवा नाहीशी तरी करतात.

( ४ ) मूळ ग्रंथांतला आक्षेपार्ह ( शृंगारिक, बीभत्स इ. ) मजकूर गाळणें.

उदा.—आदिपर्व[१४] [ मुक्तेश्वर ] १५–४५, १६–१७१, १७२, १७३; सभापर्व[१५] [ मुक्तेश्वर ] १२–११३; विराटपर्व[१६] [ मुक्तेश्वर ] ३–९६; आदिपर्व[१७] [ मुक्तेश्वर ] ९–५२, ५३, ५४[१८]

( ५ ) केवळ नजरचुकीनेहि अवक्षेप होऊं शकतात.

**प्रक्षेप** [ Interpolations ]

ग्रंथाचा प्रचार जितका जास्त, तितके त्यांत प्रक्षेपहि जास्त. ग्रंथाच्या वयाबरोबर व लेखनान्तराबरोबर त्यांतले प्रक्षेपहि वाढतात.

( १ ) पुनरुक्ति—लेखनसादृश्यामुळे वर्ण, शब्द किंवा ओळी पुन्हा पुन्हा लिहिण्यात येतात.

( २ ) ग्रंथाची नकल करीत असतांना मूळांतला एखादा शब्द वा उतारा नकलकाराला दुर्बोध वाटला तर तो स्वतःला सुचेल असा त्याचा अर्थ करतो व तोहि मूळाबरोबरच लिहून ठेवतो.

कधी कधी प्रतकाराला सुचणारे इतर ग्रंथांतील समानार्थक वा उपोद्बलक उतारे, कल्पना, पाठभेद वगैरे तो मार्जिनमध्ये किंवा पानाच्या एका बाजूला नमूद करतो व नंतरचे

१४. ' सर्वसंग्रह ' प्रत, ( प्रकाशक–माधव चंद्रोबा ).

१५. ' सर्वसंग्रह ' प्रत ( संपा.—परशुराम बल्लाळ गोडबोले, प्रका.—माधव चंद्रोबा, सन १८६३ ), पृ. १६६.

१६. ' काव्यसंग्रह ' प्रत ( संपा.—दामोदर केशव ओक ) इ. स. १९३९, पृ. ४१.

१७. ' सर्वसंग्रह ' प्रत, पृ. ११९.

१८. " ५२-५३-५४ या ओव्या फारच बीभत्स वाटल्या म्हणून या ग्रंथांतून काढून टाकल्या आहेत. आणि जेथे अशा प्रकारची कविता येईल ती नेहमी ग्रंथांतून काढून टाकली जाईल." ही संपादकांची तळटीप ( पृ. ११९ ). लक्षणीय आहे.

नकलकार, तो मूळाचाच भाग आहे असें समजून, तो मूळ ग्रंथांत समाविष्ट करतात. सायणाचार्यांच्या ऋग्वेदभाष्यांत प्रतकारांनी असे अनेक उतारे मूळांतच दडपून दिल्याचें डॉ. मॅक्समुलर यांनी दाखवून दिलें आहे.[१९]

कित्येकदा तर परस्परविरुद्ध असे सुद्धा पाठ कांहीं हस्तलिखितांत समाविष्ट असल्याचें आढळतें. हस्तलिखितांत [ मग तें मार्जिनमध्ये असो, की पानाच्या एका टोकाला असो, इतर ग्रंथकाराचा उतारा असो, की प्रतकाराला स्वतःला सुचलेला विचार असो ] जें जें आढळतें, त्याचा त्याचा मूळ ग्रंथांत साक्षेपानें समावेश केलाच पाहिजे असाहि कांहीं प्रतकारांचा हव्यास असतो.

हस्तलिखितांत कित्येकदा काकपद किंवा हंसपद घालून कांहीं मजकूर लिहिलेला असतो. नंतरचे प्रतकार तो मजकूर मूळाचाच भाग आहे असें समजून मूळांतच त्याचा अंतर्भाव करतात व पुढे पुढे तर तो मूळाचा भाग नसून प्रक्षेप आहे हें ओळखताहि येत नाहीं. प्रक्षेप जितका जुना, तितका तो मूळ ग्रंथाचाच भाग असला पाहिजे अशी समजूतहि जास्त.

( ३ ) स्वतःचें कवित्व मूळ ग्रंथकाराच्या नांवावर खपविण्याचा प्रतकारांचा हव्यास हें प्रक्षेपांचें प्रमुख कारण आहे. बहुतेक प्रक्षेप हे बुध्याच केलेले असतात. आपलें कवित्व थोरामोठयांच्या ग्रंथांत त्यांच्या नांवावर दडपून दिलें की तें सहज लोकमान्य होईल व त्याचा प्रसारहि खूप होईल अशी प्रतकारांची धारणा असते.

आपलीं विशिष्ट मतें मूळ ग्रंथकारावर लादणें व तो आपल्याच संप्रदायाचा होता असें सिद्ध करणें हाहि प्रतकारांचा एक हेतु असूं शकतो.

प्रक्षेपक आपलें कवित्व मूळ ग्रंथांत [ त्यांतल्या भाषेंत, वृत्तांत इ. ] इतक्या कौशल्यानें व चपखल रीतीनें योजतात की मूळ कोणतें व प्रक्षिप्त कोणतें हें ओळखणें मोठमोठया चिकित्साशास्त्रज्ञांनाहि अशक्य व्हावें ! कुंटे यांनी आपल्या ज्ञानेश्वरींत 'क्षेपक' म्हणून नमूद केलेल्या खालील ओव्या पाहिल्या म्हणजे वरील विधानाची साक्ष पटेल.

वेदीं त्रिकांडनिरूपण । कर्म उपासना ज्ञान ।
हेंचि श्रीकृष्ण आपण । निरूपित असे ॥
जेणें अर्जुनाचा मोह नासे । सम्यक् ज्ञान प्रकाशे ।
ऐसीं उत्तरें विश्वेशें । बोलिजती ॥
जे उत्तरमीमांसा उपनिषदें । तें मथूनियां गोविंदें ।
निरूपिजेल स्वानंदें । जेणें पार्थ उमजे ॥ [ १–२७५,२७६,२७७ ][२०]
तैं तयाची प्रज्ञा । स्थिर जाली प्राज्ञा ।
इये अर्थी अवज्ञा । करूं नको ॥ [ २–३०३ ][२१]
जैसी चंद्राची कळा । निववी जनपदा सकळा ।
तैसा ज्ञानाचा ओल्हावा डोळां । देखिला संताचिये ॥ [ १५–१४ ][२२]

( ४ ) स्वतःच्या मन्तव्याला न जुळणारा मजकूर क्षेपक ठरविण्याकडे संपादकांचा कल होऊं शकतो.

१९. F. Max Muller: Rig-Veda-Samhita (Volume I, Mandala I ) Second Edition, 1890. Preface, p. XV.

२०. कुंटे–ज्ञानेश्वरी ( षष्ठावृत्ति, सन १९२३ ), पृ. २०.

२१. कुंटे–ज्ञानेश्वरी, पृ० ४४.

२२. कुंटे–ज्ञानेश्वरी, पृ० ३६८.

## पोथीचें विश्वसनीयत्व

ग्रंथकाराचे मूळ पाठ ठरवायचे कसे ?— नकलकार कितीहि साक्षेपी असला तरी त्याच्याकडूनहि कळत वा नकळत अनेक चुका घडतात, व त्या चुका पुढल्या नकलकारांकडून तशाच ठेवल्या जाऊन त्यांत आणखी नवीन नवीन हस्तक्षेपांची भर पडण्याची संभवनीयता असते. प्रतकारांच्या प्रमादांपासून विमुक्त असलेला एकहि प्राचीन ग्रंथ दाखवितां यायचा नाही. नामदेवाच्या गाथ्याचा इथे मुद्दाम उल्लेख करावासा वाटतो. नकलकारांच्या हस्तक्षेपांमुळे नामदेवांची अभंग-संहिता इतकी गढूळलेली आहे की, त्यांतून मूळ नामदेवाचे शब्द शोधून काढणें मोठमोठया चिकित्सकांनाहि अशक्य व्हावें !

अशा स्थितींत ग्रंथकाराचे मूळ पाठ ठरवायचे कसे ?:

हस्तलिखितांवरून जर मूळसंहिता तयार करावयाची असेल तर पाठचिकित्सकाने पोथीचें विश्वसनीयत्व आधी विचारांत घेतलें पाहिजे. पोथी ग्रंथकाराच्या काळाला व स्थळाला जितकी जवळची, तितकें त्यांत प्रक्षेपांचें व पाठान्तरांचें प्रमाण कमी. पण, यालाहि अपवाद असूं शकतात. बुद्धिमान् पण निष्काळजी नकलकाराने केलेल्या नकलेपेक्षा अडाणी पण प्रामाणिक प्रतकाराने नकललेली पोथी अधिक विश्वसनीय राहूं शकते; व कालदृष्ट्या अर्वाचीन ठरलेल्या प्रतींतसुद्धा ग्रंथकाराचे किंवा ग्रंथकाराच्या जवळ जाणारे पाठ सापडूं शकतात; किंबहुना अगदी निकृष्ट गणलें गेलेलें हस्तलिखितसुद्धा मूळांतल्या कांही अधिकृत पाठांवर आपला हक्क प्रस्थापित करूं शकतें व संहितेचें मूळस्थापन करतांना त्याचा उपयोग होऊं शकतो.

पोथीवर लेखकाने स्पष्ट कालनिर्देश केला असला तर त्यांतल्या त्यांत ठीकच. नाहीतर पोथींतली भाषा, तिची बांधणी, तिचें स्वरूप, तिचा आकार, कागदाचा जुनेपणा व पोथींतली अक्षरवटिका या कसोटयांवर पोथीचा काळ ठरवावा लागतो. पोथीवर कालनिर्देश असला तरी तेवढ्यावर निभ्रांतपणें विसंबून चालत नाही. पोथींतला कालोल्लेख व वरील कसोटयांवरून ठरणारा पोथीचा काल यांच्यांत एकवाक्यता आहे की नाही याचाहि विचार केला पाहिजे. पोथींतला कालनिर्देश हा पोथी लिहिण्याचा की प्रत नकलण्याचा हेंहि पाठचिकित्सकाने ध्यानांत घेतलें पाहिजे.

## पाठपरंपरांची निर्मिति

पोथीच्या काळाप्रमाणेच ती जेथून मिळाली तें स्थळीहि ग्रंथकाराच्या अस्सल पाठांवर प्रकाश टाकूं शकतें.

मूळ ग्रंथकार जर मान्यता पावलेला असेल तर त्याच्या ग्रंथाला निरनिराळ्या ठिकाणच्या विद्याभिलाषी राजपुरुषांकडून, संस्कृति-केन्द्रांकडून, विद्यापीठांकडून, पंडितांकडून किंवा अभ्यासकांकडून मागणी येते व ती पुरविण्यासाठी मूळ ग्रंथाच्या अनेक प्रती करण्यांत येतात. त्या निरनिराळ्या प्रांतांत जातात. त्या त्या प्रांतांतले मठाधिपति किंवा पंडित आपल्या काळाला, प्रांताला व संप्रदायाला अनुसरून त्यांत स्थानिक स्वरूपांचे फेरफारहि करतात. ते फेरफारहि पुढल्या नकलकारांकडून, त्यांच्या स्वतःच्या हस्तक्षेपांसह, तसेच नकलले जातात. शिवाय प्रतकारांतहि संस्कार, शिक्षण, जात, व्यवसाय, संप्रदाय इत्यादि निरनिराळ्या प्रकारचे भेद असतातच. त्यांचाहि परिणाम त्यांनी नकललेल्या प्रतींवर झाल्याशिवाय कसा राहील ? या प्रक्रियेमुळे मूळ ग्रंथाच्या अनेक पाठपरंपरा (Recensions) निर्माण होतात. महाभारताच्या संहितेंत आर्यावर्त व दक्षिणापथ अशा दोन प्रमुख प्रादेशिक व काश्मिरी,

नेपाळी, मैथिली, बंगाली, देवनागरी, तेलगू इत्यादि अनेक प्रांतिक पाठपरंपरा निर्माण झाल्याचें डॉ. सुखठणकरांनी दाखवून दिलें आहे.[२३] मराठींतहि 'विवेकसिंधु' या ग्रंथाच्या प्रांतिक पाठपरंपरा निर्माण झालेल्या आढळतात. उदाहरणादाखल केवळ एकच गोष्ट इथे नमूद करतों. श्री. गो. रा. गोगटे व प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी संपादून प्रसिद्ध केलेल्या 'विवेकसिंधू'च्या १७ व्या अध्यायांत १७ ( अ ) व १७ ( ब ) अशीं दोन स्वतंत्र प्रकरणें[२४] छापलेलीं आहेत.[२५] विदर्भांत सापडणाऱ्या 'विवेकसिंधू'च्या प्राचीन पोथ्यांत मात्र १७ (अ) हें प्रकरण मुळीच आढळत नाही. अशा पाठपरंपरांच्या तुलनात्मक अभ्यासानें मूळ पाठ कोणता हें ठरविण्यास व मूळसंहितानिश्चितीस मदत होऊं शकते.

### वंशवृक्षाची आवश्यकता

पाठचिकित्सेकरिता व संहितेच्या मूलस्थापनेकरिता हस्तलिखितांचा वंशवृक्ष तयार करणें आवश्यक असतें. वंशवृक्ष निश्चित केल्याशिवाय कोणतें हस्तलिखित कोणत्या परंपरेंतलें हें कळावयाचें नाही. प्रत्येक हस्तलिखिताचीं कांही खास वैशिष्ट्यें असतात व त्या वैशिष्ट्यांच्या सूक्ष्म अभ्यासानेच वंशवृक्षांतलें त्यांचें स्थान ठरवितां येतें. कांही हस्तलिखितांत इतर पोथ्यांत असलेले विशिष्ट शब्द वा उतारे आढळत नाहीत, त्यांचें स्थानान्तर झालेलें आढळतें किंवा विशिष्ट अक्षरें विशिष्ट पद्धतीनेच लिहिलेलीं आढळतात. अशीं हस्तलिखितें एका परंपरेचीं समजायला पाहिजेत. वरील प्रकारांचा अभाव असलेलीं हस्तलिखितें वेगळ्या परंपरेचीं. हस्तलिखितांच्या परंपरेंतहि पुन्हा उपपरंपरा असतात.

हस्तलिखितांचा वंशवृक्ष त्यांच्यावरील कालनिर्देशानुसार न करतां त्यांच्या लेखन-वैशिष्ट्यानुसार केला पाहिजे. हस्तलिखित जरी अलीकडलें असलें तरी भाषेच्या व मजकुराच्या तुलनेवरून तें जर विश्वसनीय पोथीवरून नकललें गेलें असें आढळेल, तर कालोल्लेखदृष्ट्या प्राचीन असलेल्या पोथीपेक्षाहि, मूलसंहितानिश्चितीच्या दृष्टीनें, तें अधिक अधिकृत ठरेल.

### वस्तुनिष्ठ संपादनपद्धति

वेगवेगळ्या परंपरांच्या मुळाशीं जीं हस्तलिखितें असतात त्यांतल्या पाठांची परस्परांशीं तुलना करून, लेखकाचा मूळ पाठ किंवा त्यांतल्यात्यांत अधिकृत पाठ ठरविला पाहिजे. उपलब्ध हस्तलिखितांचें वांशिक मूळ ठरवीत असतांना जर सर्व हस्तलिखितें एकाच हस्तलिखितापासून निघालेलीं आहेत असें आढळलें, तर ती संहिता [ लेखनदोष वगळून ] जशीची तशी छापणें, व बाकीच्या हस्तलिखितांतील पाठभेद देऊन त्यांची चर्चा करणें हेंच पाठचिकित्सकाचें कर्तव्य ठरतें.

कधीकधी एखाद्या ग्रंथाचें केवळ एकच हस्तलिखित उपलब्ध होतें व संशोधन करूनहि त्याच्या आणखी प्रती मिळत नाहीत. [उदा०–'नरेन्द्रा'चें रुक्मिणी-स्वयंवर]. अशा वेळीं, तो ग्रंथ जर महत्त्वाचा असेल तर, तें एकमेव हस्तलिखित जसेंच्या तसें छापून काढणें व त्याच्या उपलब्धीची व आणखी प्रतींच्या अनुपलब्धीची कारणमीमांसा प्रस्तावनेंत करणें एवढा एकच उपाय उरतो. अशा बाबतींत पाठचिकित्सेचा प्रश्न उद्भवत नाही.

२३. V. S. Sukthankar: The Māhabhārata Ādiparvan ( 1933 ), Prolegomena, p. XXX

२४. मुकुंदराजकृत 'विवेकसिंधु', पृ० १७९–१८२.

२५. श्रीमुकुंदराजकृत 'विवेकसिंधु', पृ० ३५९–३६७.

पण बहुधा होतें असें की वंशनिश्चिति करतां करतां शेवटीं दोन किंवा तीन वंशांतलीं हस्तालिखितें कायम राहतात व प्रत्येक घटकांतलीं हस्तालिखितें एकमेकांपासून पूर्णपणें स्वतंत्र पाठ दर्शवितात.

अशा वेळीं कोणता पाठ ग्राह्य मानावा ?

अशा वेळीं सर्वांत प्राचीन व त्यांतल्यात्यांत अधिकृत ठरणारें असें जें हस्तलिखित असेल तें अक्षरशः छापणें हा संहितासंपादनाचा एक मार्ग आहे. इतिहासाचार्य राजवाडे,[२६] बा. अ. भिडे[२७] प्रभृति संपादकांचा कटाक्ष या पद्धतीवर असे. या ( वस्तुनिष्ठ ) पद्धतीचा महत्त्वाचा विशेष असा की, ग्रंथकाराच्या काळाला शक्य तितकी-जवळची अशी कमींत कमी एक तरी प्रत अभ्यासकांना जशीची तशी मिळते व तिच्यावरून विशिष्ट काळांतील भाषेचें व लेखनशैलीचें अस्सल स्वरूप अभ्यासकांना अजमवितां येतें.

जुन्यांतल्या जुन्या हस्तलिखितांतहि अनेक चुका असतात व त्यांतल्या कांहीं चुका नंतरच्या प्रतकारांनी अनुमानाने म्हणा, संदर्भाने म्हणा किंवा इतर ग्रंथांतील मूळ ग्रंथकाराच्या अधिकृत अवतरणांनी म्हणा, दुरुस्त केलेल्या असतात, त्यांनी दुरुस्त केलेले पाठ मूळ पाठांच्या जवळ जाऊं शकतात. अशा दुरुस्त्या टीपांमध्ये देऊन संपादकाने त्यांवर भाषाशास्त्रीय, तत्त्वज्ञानात्मक इत्यादि दृष्टींनी चर्चा करावी.

संपादनाच्या या पद्धतीला 'पारंपरिक' म्हणून हेटाळणारे अनेक विद्वान् आहेत. पण, विशिष्ट काळांतील भाषेचें व लेखनशैलीचें यथार्थ स्वरूप जाणून घेण्याच्या दृष्टीने ही पद्धति बरीच उपयुक्त आहे यांत शंका नाही.

### व्यक्तिनिष्ठ संपादनपद्धति

पण संपादकाच्या पाठचिकित्साकौशल्याची खरी कसोटी दुसऱ्याच पद्धतींत लागते. प्रत्येक वंशांतलीं हस्तलिखितें एकमेकांपासून पूर्णपणें स्वतंत्र असे पाठ दर्शवीत असतात व प्रत्येकच प्रतींतला पाठ ग्रंथकर्त्याच्या मूळ पाठावर आपला अधिकार प्रस्थापित करूं पाहतो. त्यांत पुन्हा सांप्रदायिक, पारंपरिक इत्यादि निरनिराळीं कवचकुंडलें घालून प्रत्येक पाठ, मूलत्वाच्या अभिमानानें, डौलाने मिरवीत असतो.

त्यांतून ग्रंथकाराचे मूळ पाठ शोधून संहितेची मूळस्थापना कशी करावयाची ?

अशा वेळीं पाठचिकित्सकाने मूळ ग्रंथकाराची भाषा, त्याची शैली, त्याची विचारसरणी व विशिष्ट पाठाची संदर्भानुकूलता या गोष्टी प्रामुख्याने विचारांत घेतल्या पाहिजेत.

### भाषा ही एक कसोटी

कुठलाहि ग्रंथकार हा आपल्या काळांत प्रचलित असलेले शब्द व व्याकरणरूपें आपल्या लिखाणांत योजतो. क्वचित्, हौस म्हणून म्हणा की पांडित्याचें प्रदर्शन म्हणून म्हणा, पूर्वकालीन भाषेंत प्रचलित असलेले कांही शब्द व व्याकरणप्रयोगहि तो आपल्या लिखाणांत योजील. पण ग्रंथकाराच्या कालानंतर प्रचारांत आलेले शब्द व व्याकरणरूपें त्याच्या लिखाणांत येणें मूलतःच अशक्य आहे. तेव्हा भाषा ही एखाद्या पाठाचा अस्सलपणा ठरवितांना, बऱ्याच प्रमाणांत निर्णायक कसोटी ठरते.

पण, पाठचिकित्सकाने भाषेची कसोटीहि तारतम्यानेच वापरली पाहिजे. कारण, भाषेचेंहि आधुनिकीकरण होत असावें; व केवळ याच कसोटीवरून विचार केला तर

२६. वि. का. राजवाडे : 'ऐतिहासिक प्रस्तावना', पृ. ३७३.

२७. 'वच्छहरण'–परीक्षण, विविधज्ञानविस्तार, जून १९२७.

प्राचीन काळांत झालेले ग्रंथहि नंतरच्या काळांत झालेले असावे असा अभ्यासकांचा तर्क होऊ शकतो. आद्यकवि मुकुंदराजांच्या ' विवेकसिंधू'चें उदाहरण या बाबतींत टळक म्हणून सांगतां येईल.

अशा वेळीं पाठचिकित्सकाने आपल्या मनाला असा सवाल विचारावा की, समोरच्या ग्रंथांतली भाषा मूळ ग्रंथकाराची आहे का प्रतकाराची आहे? ग्रंथाच्या पाठपरंपरा जशा होताच तशीच त्याच्या भाषेतहि स्थानिक व कालिक फरक होत असतात. विवेकसिंधूच्या भाषेंत तसे फरक झालेले आहेत.

स्थानिक फरकांच्या बाबतींत असें म्हणावें लागतें की, एकाच काळांत विशिष्ट भाषा बोलणाऱ्या सर्वच स्थळीं त्या भाषेचें स्वरूप सारखेंच असतें असें नाहीं. विवेकसिंधूचेंच उदाहरण देतों. शके ११२२ दुंदुभी संवत्सरीं विदर्भांत लिहिण्यांत आलेल्या विवेकसिंधूवरून नकललेली प्रत विदर्भातील संतवाङ्मयाभ्यासक श्री. रामचंद्र विठ्ठल ऊर्फ बाबाजी बोबडे यांच्या कृपेने मला पाहावयास मिळाली. तिच्या शेवटीं असलेला कालोल्लेख असा :

या ग्रंथाचा उत्तार। शके ११२२ सोत्तर
दुंदुभीनाम संवत्सर। ते दिवशीं जाहला ॥
हस्ताक्षर जयाचे। कृष्णभट्ट नाम तयाचे
रामभट्ट नाम पितयाचे। उपनाम पंडीत ॥
वस्ती तापी तीर। ग्राम नामें वत्र
हा ग्रंथ सविस्तर। उत्तार करणें जाहला ॥ [ १८–१४२,१४३,१४४ ]

या पोथीच्या व विवेकसिंधूच्या छापील प्रतींच्या भाषेंत पुष्कळच फरक आहे. त्यांपैकी अकारान्त पुल्लिंगी नामें प्रायः अकारान्त असणें हा फरक सर्वांत महत्त्वाचा वाटतो. राजवाडे ज्ञानेश्वरींत अकारान्त पुल्लिंगी नामें उकारान्त [ गणेशु, अर्जुनु, सुकाळु, उपदेशु, जीउ, वैवस्वतु इ. ] किंवा ओकारान्त [ संशयो, ज्ञानदेवो, राओ, आग्रहो, उपावो इ. ] लिहिलेलीं आढळतात. 'विवेकसिंधू'च्या प्रस्तुत पोथींत मात्र तीं प्रायः अकारान्त [ मतितार्थ, फलितार्थ, परमार्थ, त्याग, भोग, योग, नाथ, संव्हार, थोर, पूर, शारंगधर इ. ] लिहिलेलीं आहेत.

यावरून, विवेकसिंधु हा ग्रंथ शके १११० मध्ये झाला नाही असें अनुमान काढणें बरोबर आहे का? भाषेंतल्या प्रस्तुत फरकाला स्थानिक फरक म्हणतां येणार नाहीं का?

कालिक फरकांचीहि गोष्ट अशीच. विवेकसिंधूच्या भाषेचें अर्वाचिनीकरण झालेलें आहे यांत शंका नाहीं. पण तरीहि त्यांत नातळति ( १–२१ ),[२८] नुचंबळे ( १–४१ ), निफजती ( १–४८ ), बुजधि ( ३–४१ ), उठे ( ७-६ ), अशीं वर्तमानकाळाचीं व अळंगीला ( १–१०३ ), वेष्टलों, उपचारिलों ( २–२२ ), निवालों ( २–२९ ), हिरतली, आथिली ( ४–३६ ), नाथिलें ( ७-४४ ) अशीं भूतकाळाचीं रूपें; घेपे ( १–१७ ), सांडिजे ( १–१०७ ), बोलिजे ( ४–११ ) अशा कर्मकर्तरि रूपांपुढेच 'एल' जोडून सिद्ध झालेलीं कीजैल ( १–२४ ), पाविजैल ( १–३१,१२३ ), विश्वाधेल ( १–२३ ), सांगिजैल ( ४–११ ), बोलिजैल ( ५–४ ), निरोपिजैल (१३–८,१४–५०), पुसिजैल ( १५–३२ ) अशीं भविष्यकाळचीं रूपें; किजे ( १–७३ ), अनुभविजे ( १–१०० ), असिजे ( १–१०४ ), अवधारिजे ( १–४७ ), आइकिजे ( ३–१०१ ), व्यापिजे ( ३–४७ ), आइकिजेसु, धरिजेसु ( ३–९१ ), देख ( ४–२७ ), बुझिजेसु ( ६–८७ ), बुझ ( ७–१४६ ), परिस ( ११–६ ), जाणिजेसु ( १६–१९ ), पाहीं ( १६–४० ), ऱ्हावे

२८. हे उल्लेख गोगटे–संपादित ' विवेकसिंधू'तील आहेत.

( २–९५ ) असे आज्ञार्थ; उपासावा ( २–९६ ), अवधारावें, करावें ( ६–७९ ), उपमावें ( ७–१०४ ), न्हावावे ( ८–३९ ) असे विध्यर्थ; आइकजो ( ४–११ ), निरोपिजो ( १२–३० ), दीजो असे आशीर्लिङ; पै ( १–११ ), की ( ५–४१ ), गा, किरु ( १–२७ ), अपैसें ( १–७० ), पां, आपैसी ( ६–१० ) इ. अव्ययें; अंगमेळे अधिजे ( १–१०४ ), अधिष्ठिता जाला ( ४–१५ ), विचारूं जाणें ( ७–५८ ), बोलों आरंभिलें ( २–८ ) अशीं सहाय क्रियापदें; अनारिसी ( २–७९ ), कैसेनि ( १८–१० ), निरुतें अशीं सार्वनामिक विशेषणें; होऊन असणें ( २–३१ ), असतुचि असे ( ५–४६ ), बैसोनि घे ( ५–७९ ) असा वर्तमानकालीन रूपांचा रीतिवर्तमानासारखा उपयोग; नातळति ( १–२१ ), फुडि ( १–२३ ), पडिपाडें ( १–२६ ), राहाटि ( १–२७ ), कडसणि ( १–४३ ), मांदुस ( १–६६ ), वोज, चोज ( १–९६ ), कुरटु ( १–१०२ ), राणीव ( १–१०५ ), कुरवंडि ( १–१०७ ), वाडवेळ ( २–१६ ), उपलवणी ( ३–४ ), मेळापकु, दळवाडे ( ४–९ ), सिराणी ( ५–८ ), बिडार ( ६–३० ), येरयेरीं ( ७–१२६ ), बांदवडी ( ७–१३६ ), मायामांदुस ( १२–४० ) इत्यादि शब्द, धालेपणाचे ढेकर ( १–१० ), देशधडी होणें ( २–३० ), रूपानें घेणें ( ५–७९ ), स्नेह उठणें ( ७–६ ), विचारूं जाणें ( ७–५८ ), निरयाचे पाहुणे ( २–२० ), रायाणाचे भातुकें (७-७२ ) इ. वाक्प्रचार—असे ज्ञानेश्वरकालीन भाषाविशेष आढळतात हेंहि दृष्टीआड करून चालणार नाही.

### इतर कसोट्या

ग्रंथकाराची शैली हीहि फार महत्त्वाची कसोटी आहे. शैलींतच व्यक्तित्वाचा अंतर्भाव होतो. शब्द, वृत्त, छंद इत्यादींच्या निवडींत व्यक्त होणारी ग्रंथकाराची अभिरुचि हा त्याच्या व्यक्तित्वाचाच एक भाग. कोणत्याहि पाठाच्या अंतर्गत मूल्यालाच [ Intrinsic Value ] सर्वांत जास्त महत्त्व दिलें पाहिजे. याकरिता पाठचिकित्सकाला ग्रंथकाराच्या व्यक्तित्वाशीं समरस होतां आलें पाहिजे. अंतःकरणाने ग्रंथकाराच्या हृदयाशीं व बुद्धीने ग्रंथकाराच्या कल्पकतेशीं व तत्त्वचिंतनाशीं समरस व्हावयाचें अशी ही दुहेरी प्रक्रिया.

अर्थसंगति, औचित्य इत्यादि इतरहि कसोट्या आहेतच. या सर्व कसोट्या, तारतम्याने वापरून, ग्रंथकाराच्या मूळपाठांचें अनुमान पुष्कळ प्रमाणांत करतां येतें.

वरील कसोट्यांवर एखाद्या पोथींतला पाठ निश्चित केल्यानंतर मग सांप्रदायिक पाठ किंवा बहुसंख्य पोथ्यांतले पाठ कसेहि असले तरी पाठचिकित्सकाने त्यांची पत्रास बाळगूं नये. ज्यांना मूळांत कोणत्याच प्रतीचा आधार नाही अशा स्वकपोलकल्पित पाठांचा स्वीकार पाठचिकित्सकाने कधींहि करावयाचा नाही, हा चिकित्साशास्त्राचा नियम मात्र त्याने कसोशीने पाळला पाहिजे. एखाद्या पाठाच्या मूलत्वाविषयी शंका असली तरी वरील कसोट्यांवरून तो जर लेखकाचा मूळपाठ असें पाठचिकित्सकाला वाटत असेल तर त्याने तो, संशयास्पद वाटला तरीहि, स्वीकारावा.

अशा शास्त्रशुद्ध रीतींनी तयार झालेली पाठसंहिता उपलब्ध हस्तलिखितांहून वेगळी व सर्वांत प्राचीन राहील. ती पाठचिकित्सकाची व्यक्तिनिष्ठ संहिता होईल हें खरें; पण पाठचिकित्सकाच्या ज्ञानानुसार तरी, नकलकारांच्या चुकांपासून, प्रक्षेपकांच्या हस्तक्षेपांपासून व अनाधिकृत शुद्धीकरणापासून मुक्त असल्यामुळे, मूळ ग्रंथकाराच्या संहितेला ती सर्वांत जवळची मात्र राहील. ● ●

नारायण बळवंत जोशी

# मुक्तेश्वर : प्रकाशावर प्रकाश

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या एप्रिल–मे–जून १९५९ च्या अंकांत प्रा. पण्डित आवळीकर यांचा 'मुक्तेश्वरावर प्रकाश' हा लेख प्रसिद्ध झाला आहे. या लेखांत त्यांनी 'मुक्तेश्वरविषयक प्रश्न निकालांत काढण्याची वा काढल्याची भ्रामक कल्पना मनांत नाही' असें आधीच सांगून त्यांच्या मतें विचारार्ह असे नवे संबंध त्या आपल्या लेखांत खालीलप्रमाणे सुचविले आहेत :

( १ ) नाथांना दोनच मुली होत्या. पैकी दुसरी मुलगी जी कर्नाटकांत गदगजवळील डंबळच्या बाळकृष्णपंत चंद्रकेतांना दिली होती तिचा मुलगा मुक्तेश्वर. मुक्तेश्वर या मुलीचें तिसरें अपत्य असावें. मुक्तेश्वराचें कायमचें वास्तव्य डंबळलाच. बाळकृष्णपंतांचें दुसरें नांव चिंतामणि.

(२) नाथांची पहिली मुलगी, जी आजपर्यंत मुक्तेश्वराची आई समजली गेली होती, तंजावरप्रांतीं नागनाथास दिली होती व तिचेंच सासरचें नांव उमा. या उमेचा दुसरा मुलगा माधवस्वामी.

वरीलप्रमाणे दोन संबंध संभवतात असें दाखवितांना त्यांनी पूर्वीच्या मान्य अशा अनेक गोष्टींना महत्त्वाचे धक्के दिले आहेत. आजपर्यंत नाथांच्या चरित्रावर ज्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांनी लिहिलें आहे त्यांच्या सर्व लिहिण्यावर या त्यांच्या संबंध-निदर्शनाने पाणी पडत आहे. पण हे संबंध दाखविण्याच्या भरांत त्यांनी संशोधनाबाबतच्या बऱ्याच तत्त्वांकडे दुर्लक्ष केलें आहे. संशोधनांत जर कशाची अत्यंत आवश्यकता असेल तर ती आपल्या नव्या विधानांना भक्कम पुरावा दाखविण्याची. पण या महत्त्वाच्या गोष्टीकडे त्यांनी अगदींच दुर्लक्ष केलें आहे. नाथांची पहिली मुलगी जी गोदा तिचा मुलगा मुक्तेश्वर असें नाथांच्या प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांनी जें म्हटलें आहे तें चुकीचें ठरविण्यास त्यांनी सबळ पुरावा सादर करावयास पाहिजे होता. त्या आधारावर आपण दाखविलेला नवा संबंध कसा बरोबर आहे अथवा त्या संबंधाची जास्तींत जास्त शक्यता कशी आहे हें मांडावयास पाहिजे होतें. प्राचीन चरित्रकारांनी ज्या गोष्टी, त्यांना जी व जितकी माहिती मिळाली ती सर्व लक्षांत घेऊन, खऱ्या म्हणून नमूद केल्या आहेत. त्यांपैकीं कांही माहिती मान्य करावयाची व कांहीही पुरावा न देतां इतर माहिती नाकबूल करावयाची असें संशोधनांत मुळींच चालावयाचें नाही. एक बाब कबूल कां व दुसरी नाकबूल कां हें विश्वासार्ह पुराव्याने दाखवूनच मग पुढचें पाऊल टाकलें पाहिजे. पण ते असें कांहीच करीत नाहीत. फक्त त्यांना वाटतें म्हणून इतरांनी मानावयाचें असें झाल्यास मोठा अनवस्था प्रसंग येऊन ठेपावयाचा. त्यांच्या मतें नाथांना दोनच मुली होत्या, तीन नव्हत्या. महिपती केशव वगैरेंचें हें म्हणणें त्यांना मान्य आहे, पण चिंतामणि हें नाथांच्या पहिल्या मुलीच्या यजमानांचें नांव त्यांना मान्य नाही. त्याचप्रमाणे मोठी मुलगी व तिचे यजमान यांचें पैठणास वास्तव्य होतें हें म्हणणेंहि त्यांना कबूल नाही. या मान्य–अमान्यांना ते कोणताहि स्वतंत्र व सबळ पुरावा पुढे आणीत नाहीत. त्याचप्रमाणे डॉ. शं. गो. तुळपुळे जें म्हणतात की, तंजावरकडील नागनाथास नाथांची उमा

अनुक्रमणिका

या नांवाची तिसरी मुलगी दिली होती या विधानापैकी नाथांना तिसरी मुलगी होती हें प्रा. आवळीकरांना चुकीचें वाटतें, पण नागनाथास दिलेल्या मुलीचें सासरचें नांव उमा हें बरोबर वाटतें. हें असें कां वाटतें याला कारण ते देत नाहीत; म्हणजे त्यांची इच्छा एवढेंच समजावयाचें. तसेंच नाथांच्या आजपर्यंतच्या चरित्रकारांनी नाथांची मोठी मुलगी जी गोदा तथा लीला व चिंतामणी यांचा मुलगा मुक्तेश्वर हें चुकीने म्हटलें आहे असें ते म्हणतात. प्रा. आवळीकरांना तें खोटें म्हणण्यास आधार कांहीच नाही; पण त्यांच्या मनाने घेतलें की मुक्तेश्वर हा नाथांच्या दुसऱ्या मुलीचा मुलगा म्हणून त्यांच्या सोईकरिता ते इतरांना खरी माहिती नाही असें समजतात. आपल्या समजास ते लेखी अथवा परंपरेचा कोणताच आधार देत नाहीत. कांही इकडचें कांही तिकडचें मान्य करीत व कांही अमान्य करीत फक्त कल्पनेच्या भराऱ्या मारीत ते चालले आहेत. कदाचित्, त्यांच्या या लेखाच्या झोकावरून, त्यांना मुक्तेश्वराला महाराष्ट्राचा न मानतां कर्नाटकाचा ठरवावयाचा आहे असें वाटतें. त्याकरिताच त्यांनी ही गोधडी शिवण्याचें काम केलें असावें. एकदा एखादी गोष्ट मनाशीं ठरवून मग तिच्या सिद्धीकरिता वकिली करण्याचें काम चालूं झालें म्हणजे जो प्रसंग ओढवतो तोच त्यांच्यावर ओढवला आहे असें दुःखाने म्हणावें लागतें.

प्रा. पण्डित आवळीकरांना मुक्तेश्वर हा कर्नाटकाचा ठरवावयाचा असल्याने, नाथांची दुसरी मुलगी–जी कर्नाटकांत गदगजवळील डंबळ गांवीं दिली होती—तिचेंच तिसरें अपत्य मुक्तेश्वर म्हणणें त्यांना भाग पडलें आहे. या विधानास त्यांनी आधार न देतां फक्त अवांतर गोष्टीच सांगितल्या आहेत. खुद्द मुक्तेश्वर अथवा नाथांच्या या दुसऱ्या मुलीचें म्हणजे गोदा ( सासरचें नांव ) चे जावई नारायण तथा पूर्णानंद अथवा नातू शिवराम यांच्या कोणाच्याहि लिखाणांतून अथवा त्यांच्या चरित्रांतून किंवा मराठी वा कानडी समकालीन लेखकांच्या लेखनांतूनहि ते एकहि उल्लेख पुष्टयर्थ देऊं शकले नाहीत हें त्यांच्या लेखांतील मोठें वैगुण्य आहे. अनुमानाने व थोडा दूरचाच का होईना मुक्तेश्वराच्या घराण्याचा व कर्नाटकाचा संबंध दाखवितां येण्याजोगा आहे. तो मी यथावसर दाखविणारहि आहेच. त्याचा संशोधकांनी विचार करावा. असो.

डंबळच्या बाळकृष्णपंत चंद्रकेत यांचा मुक्तेश्वर मुलगा असावा असा नवा संबंध प्रा. आवळीकर सुचवितात. इतकेंच नव्हे तर त्याच्या जोडीला या बाळकृष्णपंतालाच ते चिंतामणि हें दुसरें एक नांव सुचवितात. या दुसऱ्या नांवास ते कोणताहि आधार देत नाहीत. चिंतामणि नांव सुचविण्याचें कारण एकच की मुक्तेश्वराने आपल्या वडिलांचें नांव चिंतामणि म्हणून स्पष्ट म्हटलें आहे व त्यामुळें तें नाकारून चालत नाही, व बाळकृष्णपंतांना तर वडिलांच्या ठिकाणीं आणून बसवावयाचें आहे, मग ते तरी दुसरें काय करूं शकणार ! याचा अर्थ एका चुकीवर पांघरूण घालण्याकरिता दुसरी चूक करावी लागत आहे. शिवराम पूर्णानंदाने आपल्या गीताचंद्रिकेंत म्हटलें आहे " येकनायक तोचि जाली बाळकृष्ण चि होउनी लक्ष्मीश स्वपदीं ठेविलें नारायणाकार " ( गीताचंद्रिका परिशिष्ट, गीत २८ वें अथवा इतिहास मंडळाचा शके १८३३ चा अहवाल पान ५९ ). शिवरामाने कोठेहि बाळकृष्णपंतांचें पर्यायनाम चिंतामणि म्हणून लिहिलेलें नाही. मुक्तेश्वरानेहि कोठे चिंतामणीप्रमाणेच बाळकृष्ण हेंहि आपल्या पित्याचें नांव होतें असें लिहिल्याचें अद्याप आढळलें नाही. इतकेंच नव्हे तर, दुसऱ्याहि कोणी तसा उल्लेख केला नाही. मग असें समजावयाचें काय की मुक्तेश्वराने व त्याच्या तथाकथित सख्ख्या बहिणीने–लक्ष्मीने—वडिलांच्या नांवाची वांटणी करून घेतली होती की, मुक्तेश्वराने बाळकृष्ण नांव उच्चारावयाचें नाही व लक्ष्मीचे पति नारायण

तथा पूर्णानंद व मुलगा शिवराम यांनी चिंतामणि नांव घ्यावयाचें नाही ? ही भाऊबंदकी फार अजब आहे खास. बरें, शिवरामाने अथवा मुक्तेश्वराने तरी लक्ष्मी व मुक्तेश्वर यांच्या या सुचविल्या गेलेल्या नात्याचा कोठे तरी दूरान्वयाने का होईना निर्देश केला आहे काय ? कोठेहि आढळत नाही. मग हा कल्पनेचा स्वैरसंचारच नव्हे का ? तीच गत त्यांनी मुक्तेश्वराचें नांव पुंडाजी अथवा पुंडा अगर पंडा असणें शक्य आहे असें म्हटलें आहे त्याची. कर्नाटकांत पांडुरंगाचेंच पुंडाजी, पुंडा अथवा पंडा असें होत असतें. मुक्तेश्वराचें नांव पांडुरंग असल्याचें कोणास लेखी अगर परंपरेने असल्याचें माहीत नाही. प्राध्यापक आवळीकरांच्या जवळ कल्पना-विलासाखेरीज कांही आधार असेल असें वाटत नाही. खुद्द मुक्तेश्वरास आपल्या या पांडुरंग नांवाची कल्पनासुद्धा असल्याचें त्याच्या काव्यावरून दिसत नाहीं. प्राचीन चरित्र-कारांनी पुंडाजी हें नांव नाथांच्या कर्नाटकांत दिलेल्या मुलीच्या मुलाचें एवढेंच लिहिलें आहे. तो तेवढाच भाग मानून प्रा. आवळीकर तें नांव मुक्तेश्वरास चिकटवूं पाहत आहेत. श्री. बा. अ. भिडे " व याच दांपत्याला मुक्तेश्वर हा 'गुंडा पुत्र' लाभला" असें लिहितांना 'बा. अ. भिडे यांच्या मनांत काय होतें तें सांगतां येत नाही' असें म्हणून व मूळ संदर्भापासून तेवढेच शब्द तोडून प्रा. आवळीकर वाचकांची दिशाभूल करूं पाहत आहेत. गुंडा शब्द श्री. भिडे यांनी पुंडाकरिता वापरला नसून 'पुत्र व्हावा ऐसा गुंडा' यांतील गुंडा शब्द त्याच्या सर्व अर्थासह घेतला आहे हें का प्रा. आवळीकरांना सांगावयास पाहिजे ? श्री. भिडे दांपत्य म्हणतात तें नाथांची दुसरी मुलगी व बाळकृष्णपंत यांच्याबद्दल नसून तो शब्द मोठी मुलगी व चिंतामणी या दांपत्याबद्दल. तंजावरच्या नागनाथाने व त्याची पत्नी उमा या नांवाने व ती उमा म्हणजे नाथांची एक मुलगी या कल्पनेने त्यांच्या मनाची एकदा पकड घेतल्यामुळे त्यांच्या विचारांना त्याच दिशेने चालना मिळाली आहे. उमा हें नांव नाथांच्याच मुलीचें होतें हें डॉ. तुळपुळे निःसंदिग्धपणें सिद्ध करूं शकले नाहीत इकडे प्रा. आवळीकरांनी लक्ष दिलें नाही. त्यांना तसें एक विधान सापडलें त्या अनुरोधाने आपली कल्पना की मुक्तेश्वरास डंबळास कर्नाटकांत आणून बसवावयाचा. तिच्या पूर्तीकरिता ते सर्वत्र उलथा-पालथ करूं लागले. मुक्तेश्वराच्या काव्यांत कर्नाटकांतील क्षेत्रांचे कांही उल्लेख येतात. एके ठिकाणीं कन्नड कवि कुमारव्यास यांच्या कवितेंतील एका उताऱ्याशीं, श्री. शं. बा. जोशी यांनी दाखविल्याप्रमाणे, विलक्षण साम्य आढळून येतें व कुमारव्यास हा डंबळच्या परि-सरांतीलच म्हणून मुक्तेश्वरास ते डंबळनिवासी ठरवितात. पण आश्चर्य हें वाटतें की, डंबळला मुक्तेश्वराची मावशीच राहत असल्याने मुक्तेश्वराने तिच्याकडे कांही काल वास्तव्य करण्यास कोणीं बंदी केली होती काय ? त्या वास्तव्यांत त्याच्यासारखा प्रतिभावान् व अभिजात कवि कानडी वाङ्मयांतील रस चाखणार नाही काय ? त्या वास्तव्यांत त्याने कर्नाटकांतील कांही भागांना प्रत्यक्ष भेटी देऊन व कांही भागांची ऐकीव माहिती घेऊन आपल्या काव्यांत त्याने योग्य प्रसंगीं त्यांचा निर्देश केला नसेल काय ? शिवाय मोठमोठया प्रज्ञावान् व प्रतिभावान् कवींच्या काव्यांत अनेक ठिकाणीं विचारसाम्य व कल्पनासाम्य आढळतें तें त्यांना स्वतंत्रपणें स्फुरूं नये काय ? मुक्तेश्वराचा जन्म व कायम वास्तव्य डंबळलाच असतें तर त्याच्यासारख्याने विपुल प्रमाणांत कानडी कविता करणेंहि साहजिक होतें; पण अद्याप तरी कोणाच्याहि प्रकाशझोताने त्याच्या कानडी कविता प्रकाशांत आलेल्या दिसत नाहीत. तेंच त्याचा मावस भाचा—लक्ष्मीचा मुलगा—शिवराम पूर्णानंद याचीं बरींच कानडी पद्यें मिळालीं आहेत व त्यांपैकी बऱ्याच पद्यांचा त्यांच्या सांप्रदायिकांमध्ये प्रसारहि आहे आणि हें साहजिकहि आहे, कारण त्याचा कानडी

प्रांताशीं पुष्कळच संबंध आला. मुक्तेश्वराच्या काव्यांत कर्नाटकांतीलच काय पण तामीळ वगैरे प्रांतांतल्या तीर्थक्षेत्रांचीं नांवें येतात याचें कारण त्याने आपली मावसबहीण लक्ष्मी व मेहुणे नारायण तथा पूर्णानंद यांच्याबरोबर पहिल्या अथवा दुसऱ्या यात्रेच्या वेळीं या सर्व भागांना भेटी दिल्या असाव्या. पूर्णानंद व लक्ष्मी यांनी शके १५३२-३३ पासून शके १५५४ पर्यंत काशीरामेश्वराच्या सात यात्रा केल्याचा दाखला पूर्णानंदचरित्र, वंशावळी वगैरेमध्ये मिळतो. आतापर्यंतच्या संशोधनांत बहुतेक सर्वांना मान्य झालेला श. १४९६ ते १५०० च्या सुमाराचा मुक्तेश्वराचा जन्मशक प्रा. आवळीकर मान्य करीत नाहीत. ते शके १५३१ हा जन्मशक मानतात. त्यामुळे वर सुचविलेली पूर्णानंदाच्या बरोबर मुक्तेश्वराने यात्रा केली असली पाहिजे हें त्यांना कसें कबूल करिता येईल ? वास्तविक शके १५०० च्या सुमाराचा मुक्तेश्वराचा जन्मशक मानल्याने–व तोच जास्त बरोबर कसा आहे तें पुढे पाहूंच,– मुक्तेश्वराच्या आयुष्यांतील घडामोडींचा व्यवस्थित उलगडा होतो. पण लक्ष्मीपेक्षा मुक्तेश्वर लहान ठरवावयाचा असल्याने ते १५३१ शकालाच चिकटतात. पण यामुळे किती अनवस्था प्रसंग गुदरतो इकडे ते लक्ष देत नाहीत. असो.

आता आपण त्यांनी दाखविलेल्या दुसऱ्या महत्त्वाच्या 'संबंधाकडे' वळूं. आतापर्यंत एकमताने, प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांनी–व परंपरेने मानिलें आहे की, नाथांची मोठी मुलगी जी गोदा तथा लीला ही मुक्तेश्वराची आई. मुक्तेश्वराच्या वंशजांच्या वंशवृक्षामध्ये सुद्धा हाच संबंध नमूद केला आहे. या सर्व पुराव्यास डावलून प्रा. आवळीकर गोदा ही तंजावरकडील नागनाथाची पत्नी व माधवस्वामींची आई ठरवूं पाहत आहेत. प्राध्यापकांना ज्या गोष्टी संमत आहेत त्यांच्यापासूनच आपण विचार करावयास लागू. त्यांनी नाथांच्या मोठ्या मुलीचा जन्मशक आपल्या लेखांत दिला नाही; तेव्हा त्यांनी दिलेल्या शिवरामाच्या जन्मशकापासून म्हणजे श. १५५४ च्या पासूनच मागे जात त्याच्या आईचा जन्मशक, त्यामागे जात त्याच्या आजीचा म्हणजे नाथांच्या दुसऱ्या मुलीचा–डंबळच्या गोदाचा–जन्मशक व नंतर मग नाथांच्या मोठ्या मुलीचा जन्मशक कोणता संभवतो तें पाहूं.

शिवराम पूर्णानंद हा डंबळच्या गोदाची मुलगी जी लक्ष्मी व महागांवचे नारायण तथा पूर्णानंद यांचा मुलगा. लक्ष्मीनारायणांचें हें सातवें अपत्य. लक्ष्मी व नारायण यांचा विवाह झाला त्या वेळीं लक्ष्मी फार तर पांच वर्षांची होती व नारायण ९-१० वर्षांचा होता. विवाहानंतर नारायण काशीस गेला व तेथेच तो आपल्या गुरूजवळ बरींच वर्षे राहिला. लक्ष्मी वयांत आली असून तिला आपल्या पतीच्या सहवासाची उत्कंठा लागलेली पाहून व नारायणाची परत येण्याची वाट पाहून नारायणाचे चुलते राम दीक्षित व श्वशुर बाळकृष्णपंत जातीने काशीस गेले व ब्रह्मानंद स्वामींच्या आज्ञेप्रमाणे नारायणास डंबळास घेऊन आले. ( पूर्णानंदचरित्र–अप्रकाशित, अध्याय ५, ओव्या ४५ ते ५०. हें पूर्णानंद-चरित्र प्रसिद्ध झाल्यास शिवरामस्वामी पूर्णानंद, पूर्णानंद, लक्ष्मी, गोदा, रंगनाथस्वामी निगडीकर, रुक्मणा पंडित वगैरेंच्या चरित्रांवर बराच प्रकाश पडणार आहे ). इकडे आल्यावर त्यांनी आपला शिष्य बुलबुले अथवा चिदानंद याच्याकरिता शके १५३२ मध्ये अवधूतगीता टीका लिहिली. ( महाराष्ट्र सारस्वत पुरवणीसह, पान ४३८ ). या वेळीं लक्ष्मीचें वय १८-१९ वर्षांचें असावें असें धरल्यास तिचा जन्मशक १५१३ च्या सुमारास येतो. ती जन्मल्यावेळीं गोदाचें वय २२-२३ वर्षांचें असावें व अजमासें १४९० शकेमध्ये तिचा म्हणजे डंबळच्या गोदाचा जन्म समजावयास हरकत नाही. डंबळची गोदा व तिची मोठी बहीण यांच्यामध्ये ६

वर्षांचें अंतर धरल्यास, ( कारण या दोघींच्यामध्ये हरिपंडिताचा जन्म आहे ) नाथांच्या या मोठ्या मुलीचा जन्म शके १४८४ च्या आसपासचा ठरतो. हा तिचा जन्मशक पुढील गोष्टींच्या विचाराच्या दृष्टीने व प्रा. आवळीकरांनी जो संबंध दाखविण्याचा प्रयत्न केला आहे त्याच्या यथार्थदर्शनास महत्त्वाचा आहे.

संशोधनांत कालसंगति व व्यावहारिक अनुभव यांची नेहमी सांगड घालीत गेलें पाहिजे. या महत्त्वाच्या सिद्धांताला अनुसरून ही शके १४८४ सालीं जन्मलेली मुलगी तंजावर प्रांतीं नागनाथास दिली असणें व माधवस्वामी त्या जोडप्याचा मुलगा असणें शक्य आहे काय याचा आता विचार करूं. प्रा. आवळीकर महाराष्ट्र सारस्वत पुरवणीसह पान ९९४ चा संदर्भ देतात. ते तसेच पुढे पान ९९६ वर नजर टाकते तर त्यांना आढळलें असतें की, माधवस्वामीने आपला भारत ग्रंथ शके १६२५ मध्ये लिहावयास घेऊन त्याचें ८८२७४ ओव्यांचें लेखन त्याने केवळ चार वर्षांत म्हणजे शके १६२९ मध्ये संपविलें. एवढा मोठा ग्रंथ एवढ्या झपाट्याने संपविणारा गृहस्थ फार तर ६० वर्षे वयाचा असणें शक्य आहे. समर्थ रामदास वगैरेंचे महत्त्वाचें लेखन साधारणतः पन्नास ते पंचावन वर्षांच्या आंतच झालें. नाथांचें भावार्थ रामायणाचें लेखन त्यांचीं साठ वर्षे उलटून गेल्यानंतर सुरू केल्याने तें पूर्ण होऊं शकलें नाही. या गोष्टी जमेस धरतां माधवस्वामीने आपल्या वयाच्या ६० व्या वर्षीं भारत पूर्ण केलें असें ठरविणें कोणत्याहि प्रकारें अयोग्य म्हणतां येणार नाही. तेव्हा शके १६२९ च्या मागे साठ वर्षे जातां शके १५६९ हा त्याचा जन्मशक येतो. आता या वर्षीं त्यांची गोदा तया उमा इचें वय काय असणार? तर १५६९ — १४८४ = ८५. म्हणजे वयाच्या ८५ व्या वर्षीं नाथांच्या या मोठ्या मुलीस हा माधवस्वामी झाल्याचा चमत्कार मानावा लागतो. असा कांही चमत्कार याबाबत झाल्याचा कोणीहि निर्देश केला नाही. बरें, इतकेंहि असो; स्वत: माधवस्वामी आपल्या ग्रंथांत आपली आई उमा ही नाथांची मोठी मुलगी गोदा व आपण नाथांचे नातू असा-तरी कोठे उल्लेख करतात काय? तसा कोठे उल्लेख केल्याचा पुरावा अद्याप पुढे आलेला नाही व त्याचा संभवहि दिसत नाही. शिवराम आपले पणजोबा एकनाथ म्हणून लिहितो, मुक्तेश्वर नाथ आपले आजोबा म्हणून सादर नमूद करतो, मग माधवस्वामीनेच तसा उल्लेख कां करूं नये! का असा उल्लेख करणें त्यास कमीपणाचें वाटलें? महाराष्ट्रामध्ये नाथांच्या चरित्रावर लिहिल्या गेलेल्या एकाहि ग्रंथांत गोदा व नागनाथाच्या विवाहाचा चुकून सुद्धा उल्लेख नसतांना व तिचा पैठणच्याच चिंतामणीशींच विवाह झाल्याचें स्पष्ट लिहिलेलें असतांना व शकमित्यांचा व घटनांचा मेळ बसतो की नाही याचाहि विचार न करतां कांहीतरी कोठे-तरी व केव्हातरी लिहिल्या गेलेल्या लिखाणास प्रमाण समजून आपणाबरोबर इतरांनाहि घोटाळ्यांत टाकणें हें संशोधनाच्या दृष्टीने अनिष्ट आहे. कोणतीहि नवी कल्पना पुढे मांडण्याच्या अगोदर ज्या गोष्टी पूर्वलेखनाने व परंपरेने खऱ्या समजल्या गेल्या आहेत त्या खोडण्याजोगा भक्कम व विश्वासार्ह पुरावा असल्याची खात्री झाल्यावरच मग ती कल्पना पुढे मांडणें योग्य होय. प्रा. आवळीकरांनी नागनाथ व गोदा यांचा हा जो नवा संबंध दाखविण्याचें धाडस केलें आहे त्याचा असा अर्थ घ्यावयाचा काय, की नाथांनी आपल्या मोठ्या मुलीचा विवाह तंजावरच्या बाजूस जाऊन व गुप्तपणें नागनाथाबरोबर उरकला! व म्हणून महाराष्ट्रांतील कोणत्याहि चरित्रकारास व आप्तेष्टांसहि ही गोष्ट माहीत नव्हती!

व तो संबंध आता ते प्रसिद्ध करीत आहेत ? पण त्यास त्यांनी आपल्याजवळील आधार तरी सादर करावयाचा होता. किती भ्रामक तर्कांवर विसंबून प्रा. आवळीकर हा 'नवा संबंध' पुढे आणीत आहेत !! बिचारी गोदा ८५ व्या वर्षी हयात तरी होती की नाही हें तो एक परमेश्वरच जाणे !!! मागील सर्व विवेचनावरून प्रा. आवळीकरांचा तर्क किती चुकीचा आहे तें स्पष्ट दिसून येईल.

याप्रमाणे नागनाथाबरोबर गोदाचा तसा लीलाचा विवाह असंभवनीय असल्याचें स्पष्ट झाल्यावर व बाळकृष्णपंत चंद्रकेतांचा मुक्तेश्वर मुलगा मानणेंहि अयोग्य असल्याचें पाहिल्यावर परंपरेने व प्राचीन-अर्वाचीन चरित्रकारांनी निःसंदिग्धपणें लिहिलेल्या गोदा व चिंतामणि या पैठणवासी दांपत्याचा मुलगाच मुक्तेश्वर हें सिद्ध होतें. 'गौतमीच्या तटाकीं' किंवा 'गोदावरीतटनिवासी' म्हणजे पैठणमध्ये जन्मलेला व पैठणासच राहणारा असाच अर्थ त्या शब्दसमुच्चयांचा होतो हें निराळें लिहिण्याची आवश्यकता नाही.

मुक्तेश्वराच्या काव्यांत कर्नाटकांतील तीर्थें, चालीरीति, खेळांचीं नांवें येतात, पण त्याचें कारण तो कर्नाटकांतील राहणारा म्हणून नव्हे, तर आपल्या मावशीकडे डंबळास येऊन जाऊन असणारा व दक्षिण हिंदुस्थानच्या यात्रा केलेला म्हणून हें मागे दाखविलेंच आहे. तरीपण मुक्तेश्वराचा जरी नाही तरी त्याच्या वडिलांचा अथवा आजोबांचा निवास कर्नाटकांत असण्याचा, अगदी दूरान्वयानें, संभव आहे असें दाखवितां येण्याजोगें आहे. तें आता विचारार्थ ठेवितों. मात्र या ठिकाणीं सुरुवातीलाच निःसंकोचपणें सांगून टाकिलेलें बरें की, कोणत्याहि लेखी आधारावर माझें म्हणणें मी मांडीत नाही; तर केवळ तर्कांवर आधारित व मुक्तेश्वराचें घराणें व कर्नाटक यांचा संबंध दाखविल्याने कांही मंडळींना समाधान वाटत असेल, तर तें त्यांना मिळो म्हणून येथे तें लिहिण्याचें धाडस करीत आहें.

कोणताहि पुरावा न देतां श्री. आजगांवकर 'चिंतामणि हे मूळचे राहणारे कर्नाटकांतले' असें म्हणतात व तेवढाच आधार प्रा. आवळीकरांना मुक्तेश्वर हा डंबळच्या बाळकृष्णपंत चंद्रकेतांचा मुलगा असावा असें म्हणण्यास पुरेसा झाला आहे. आजगांवकर बाळकृष्णपंत म्हणजेच चिंतामणी असें म्हणत नाहीत, इकडे प्रा. आवळीकरांनी सोइस्करपणें दुर्लक्ष केलें आहे. बुडत्यास काडीचा आधार म्हणतात तो हा असा.

प्रा. आवळीकर "मुक्तेश्वर हें कवीने धारण केलेलें नांव असून, मुद्गल हें त्याचें व्यक्तिनाम होतें, हें शंकातीत सत्य" समजतात, मग पुंडाजी, पुंडा वगैरे नांवें कोठे गेलीं ? तीं सुचवितांना मुद्गल नांव विसरलें की काय ? मुद्गल हें व्यक्तिनामच होतें हें सिद्ध करण्याची आवश्यकताच नाही असें म्हणून ते मोकळे होतात हा काय प्रकार ? मुद्गल हें आडनांव आजहि आढळतें, व तसें घेणेंच युक्त होय. देशस्थांत हें आडनांव असून पैठणच्या बाजूला या आडनांवाचीं घराणीं आजहि वास्तव्य करीत आहेत. मुद्गल हें आडनांव घेतल्यास मुक्तेश्वराच्या वाडवडिलांचें वास्तव्य कर्नाटकांत होतें या विधानाव थोडा आधारहि मिळूं शकतो. देशस्थांत वृत्तीवरून, नोकरीवरून व गांवावरून आडनांवें पडतात. तीं आडनांवें वंशपरंपरा कायमच असतात असेंहि नाही; कारणपरत्वें बदलतातहि. कर्नाटकांत विजापूर जिल्ह्याच्या पलीकडे, इलकलपासून २०-२२ मैलांवर रायचूर जिल्ह्यांत मुद्गल या नांवाचें किल्ला असलेलें इतिहासप्रसिद्ध शहर आहे. विजयनगरचे हिंदुराजे व विजापूरचे आदीलशाही मुसलमान राजे यांजमध्ये रायचूर, मुद्गल वगैरे भागांबाबत नेहमी तंटे उद्भवावयाचे व त्यामुळे तेथे नेहमी अस्वस्थ वातावरण असावयाचें. विजापूरच्या आदीलशाही राज्यांत प्रथमपासून मराठीचें वर्चस्व होतें व त्यामुळे अनेक महाराष्ट्रीय कुटुंबें या बाजूस आलीं. त्याचप्रमाणे हें अत्रिगोत्री,

आश्वलायनसूत्री, करवीरनिवासी लक्ष्मी व सोनारीचा भैरव हीं कुलदैवतें असणारें कुटुंब विजापूरच्या बाजूने पुढे मुद्गलास राहिलें असावें व तेंच पुढे चिंतामणीच्या वडिलांच्या अथवा आजोबांच्या वेळीं नेहमीच्या त्रासास कंटाळून शके १४६०–७० च्या सुमारास पैठणकडे गेलें असावें ( तालिकोटची लढाई पुढे १४८७ मध्ये झाली ). हें मुद्गलकडून आलेलें घराणें म्हणून यास मुद्गल आडनांव पडलें असावें. नाथांना या मुद्गल घराण्यांतील चिंतामणि आपल्या मोठ्या मुलीस योग्य वर वाटल्याने हा विवाह घडवून आणला असणार. गोदा अथवा लीलाचें वय त्या वेळीं सात अगर आठ वर्षांचें असणार, म्हणजे शके १४९२ मध्ये हा विवाह झाला असावा. त्या वेळीं चिंतामणीचें वय १३–१४ वर्षांचें फार तर असणार व यास नाथांनी आपल्याकडे विद्याभ्यासाकरिता ठेवून घेणें अशक्य मानण्याचें कारण नाही. या वस्तुस्थितीसच चरित्रकारांनी घरजावई असें सहज म्हटलें असेल. पण इतक्या खोलांत आज जाण्याची आवश्यकता नाही. शके १४८४ मध्ये जन्मलेल्या गोदा तथा लीलास तिच्या सुमारें सोळाव्या वर्षी मुक्तेश्वर जन्मला असला पाहिजे म्हणजे तें वर्ष शके १५०० येतें. या मुक्तेश्वराला त्याच्या वयाच्या २१ व्या वर्षापर्यंत नाथांना सहवास घडला व नाथांच्या भावार्थरामायणलेखनाचा परिणामच त्याचें प्रथमचें काव्यलेखन, विविध वृत्तांत रामायण लिहिण्यांत झाला; व त्याचें तें रामायण वाचण्याचा त्याचा तो प्रथम प्रयत्न होता हें सहज दिसून येणार आहे. याप्रमाणे हें घराणें पैठणलाच स्थाइक झालेलें व त्यामुळे मुक्तेश्वराचा जन्म व त्याचें महत्त्वाचें काव्यलेखन पैठणलाच झालें हें आणखी सिद्ध करीत बसण्याची आवश्यकता नाही.

मुक्तेश्वर दत्तभक्त असल्याने तो औदुंबर व नरसोबाची वाडी या दत्तस्थानांच्या आणि करवीरच्या कुलदेवतेच्याहि जवळ अशा पंचगंगातीरीं तेरवाडास राहण्यास उत्तर वयांत गेला असावा. त्याचमुळे त्याने भावार्थरामायणाचा उर्वरित भाग तेथे लिहिला असावा. हा भाग नुकताच उजेडांत आल्याचें प्रा. आवळीकरांना माहीत असणारच.

प्रा. आवळीकरांनी आपल्या लेखांत आणखी कांहीं प्रश्न उपस्थित केले आहेत. मुख्य प्रश्नाचा निकाल त्या प्रश्नांचा आपोआपच निरास करणार आहे; पण एका वादग्रस्त प्रश्नाबद्दल येथे थोडेसें लिहिणें अयोग्य होणार नाही. तो प्रश्न म्हणजे लीला विश्वंभर हें मुक्तेश्वराच्या माता–पित्यांचें नांव संभवतें की नाही. शिवराम पूर्णानंद आपल्या ग्रंथांत व पद्यांत अनेक ठिकाणीं आपल्या मातापित्यांचा–लक्ष्मीनारायणांचा–उच्चार करतो. नारायण हे त्याचे गुरुहि होते. लक्ष्मीवर त्याची अत्यंत भक्ति. ही मातापित्यांच्या उल्लेखाची कल्पना त्याने आपला मावसमामा सुप्रसिद्ध कवि मुक्तेश्वर याच्याकडून घेतली असावी काय ? मुक्तेश्वराने लीला-विश्वंभर हें मातापित्यांचेंच नांव योजलेलें असल्याची शिवरामाची खात्री असावी. शिवाय शिवरामाचे नारायण व मुक्तेश्वराचे विश्वंभर गुरु असणें हें साम्यहि आहेच. या दृष्टीने संशोधकांनी विचार करावा. ● ● ●

महामहोपाध्याय डॉ. वा. वि. मिराशी

# 'शककाल' शब्दाचा खरा अर्थ

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या गेल्या अंकांत (वर्ष ३३, अंक ११९) प्रा. कृ. मो. शेंबवणेकरांचा 'शकार्थावर अभिनव प्रकाश' या शीर्षकाचा लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत त्यांनी कांही अभिनव सिद्धान्त पुढे मांडले आहेत. ते असे :

## शेंबवणेकरांचे अभिनव सिद्धान्त

(१) युधिष्ठिराने स्थापलेल्या कालाला शककाल अशी संज्ञा होती. याला प्रमाण ब्रह्मगुप्ताच्या ब्राह्मस्फुटसिद्धांतांतील खालील वाक्य किंवा चरण—'त्रीणि शतादीनि कलेर्गोऽगैकगुणाः शकान्तेऽब्दाः ।' या आर्यार्धातील पहिलीं 'त्रीणि शतादीनि' हीं दोन पदें पूर्वार्धाशीं संबद्ध आहेत. राहिलेल्या पदांचा अर्थ 'कलियुगाचीं शकाच्या अंतीं ३१७९ वर्षे होतात' असा आहे. युधिष्ठिराच्या शकाची समाप्ति ३१७९ वर्षांनी झाली आणि त्यानंतर सातवाहन किंवा शालिवाहन शक सुरू झाला. वरील वाक्यांत युधिष्ठिराने स्थापिलेल्या वर्षगणनापद्धतीला 'शक' असें म्हटलें आहे. तेव्हां 'शककाल' म्हणजे शकांनी किंवा सीथियन् लोकांनी स्थापिलेला संवत् असा अर्थ बरोबर नाही.

(२) 'शकान्ते' या पदावरून एका कालगणनेचा अंत निश्चित झाल्याचें स्पष्ट दिसतें. त्यानंतर सातवाहन वंशाने खिस्ती शकाच्या पहिल्या शतकांत संवत् किंवा शकवर्षगणना सुरू केली. प्राचीन पंडितांनी या वर्षगणनेच्या संस्थापकास 'शकभूप' म्हटलें आहे खरें, पण ते त्यांच्या इतिहासविषयांतील अनभिज्ञतेमुळे होय.

(३) ही दुसरी शकवर्षगणना दाक्षिणेंतील असली तरी ती वायव्य प्रांतांत व काश्मीरांत मध्यकालीं रूढ झाली याचें कारण सातवाहन वंशाच्या एका शाखेने काश्मीरांत राज्य स्थापलें हें होय. खिस्ती शकाच्या नवव्या–दहाव्या शतकांतील काश्मीरचा राजवंश सातवाहन कुलांतील होता असें सोमदेवाने कथासरित्सागरांत म्हटलें आहे. सातवाहन राजांबरोबर त्याचा शकहि काश्मीरांत गेला.

(४) शकवर्षगणना कनिष्काने स्थापिली असा प्रचलित समज आहे; पण या अनुमानावर जबरदस्त आक्षेप हा कीं, 'उत्तरेंत स्थापिलेला शक सर्व दक्षिण भारत—आणि फक्त दक्षिण भारतच—कसा अखंडितपणें व्यापून आजवर टिकून राहिला ?' या कूटप्रश्नाचा समाधानकारक उलगडा युरोपियन इतिहासकारांनी केला नाही आणि भारतीय लेखकांनीहि त्यापुढे जाण्याची आपली ताकद नसल्याचें पर्यायाने कबूल केलें आहे. पण वर दिलेल्या ऐतिहासिक पुराव्यावरून मूळ दक्षिण भारतांतील शक उत्तरवायव्य प्रदेशांत कसा गेला याची नीट उपपत्ति लागते.'

## वरील प्रमाणांचें परीक्षण

हल्लीं आपण 'शक' हा शब्द 'काल' किंवा 'वर्षगणनापद्धति' या अर्थीं योजीत असलों (उ. विक्रमशक, शालिवाहन शक) तथापि तो शब्द त्या अर्थीं प्राचीन काळीं संस्कृत भाषेंत प्रचलित नव्हता. कोणत्याहि संस्कृत कोशकाराने तो त्या अर्थीं दिला नाही.

आता आपण ज्याला 'शालिवाहन शक' म्हणतों त्याला प्राचीनकाळीं 'शककाल' म्हणत व कोरीव लेखांत त्याच्या वर्षांचा उल्लेख 'शकनृपतिसंवत्सर', 'शकनृपतिराज्याभिषेकसंवत्सर', 'शकनृपकाल', 'शाके' इत्यादि प्रकारें केलेला आढळतो. तेव्हा तो संवत् कोणीं शक राजाने (बहुधा कनिष्काने) स्थापिला होता असें प्रचलित मत आहे. तो दक्षिणेंत कसा आला ह्याची चर्चा पुढे करूं. प्रा. शेंबवणेकरांच्या मतें 'शक' शब्द आरंभीं युधिष्ठिराने स्थापिलेल्या वर्षगणनेचा वाचक होता. पुढे त्याचा प्रयोग सामान्यार्थी होऊं लागला. 'शककाल' म्हणजे केवल वर्षगणनापद्धति. यापेक्षा जास्त अर्थ त्या शब्दांत नाही, म्हणून या कालाचा शक लोकांशीं संबंध नाही, असें मत प्रा. शेंबवणेकरांनी केसरी वृत्तपत्राच्या १६ जून १९५७ च्या अंकांतील लेखांत प्रथम प्रतिपादिलें होतें. त्याला उत्तर कोणीं 'एक वाचक' या सहीने त्याच वृत्तपत्राच्या ७ जुलै १९५७ च्या अंकांत दिलें होतें. त्या वेळीं केलेल्या चौकशीवरून हे वाचक कोणी सामान्य नसून महाराष्ट्रांतील ख्यातनाम संशोधक आहेत असें समजलें होतें. त्यांनी म्हटलें होतें कीं 'त्यांनीं (प्रा. शेंबवणेकरांनी) बृहत्संहितेंतील शकेन्द्रकाल व शकभूपकाल हे शब्द पाहिले नसावेत अथवा पाहिले असल्यास आपल्या नवीनच मांडल्या जाणाऱ्या सिद्धान्ताच्या विरुद्ध ते शब्द येतील म्हणून त्यांनी त्यांचा उल्लेख केला नसेल. संशोधन करून सत्य स्थापितांना विरुद्ध दिसणारे शब्द किंवा वाक्यें यांकडे दुर्लक्ष करून चालत नाही. तीं विचारांत घेऊन सिद्धान्त स्थापन करावा लागतो. वराहमिहिर तरी शककाल, शकभूपकाल, शकेन्द्रकाल हे शब्द एकार्थक मानतो व त्याचा प्रसिद्ध टीकाकार उत्पल याने एक हजार वर्षांपूर्वी तसेंच मत व्यक्त केलें होतें.' पत्रिकेच्या गेल्या अंकांतील लेखांत प्रा. शेंबवणेकरांनी शकेन्द्रकाल म्हणजे युधिष्ठिरकाल असा अभिनव अर्थ केला आहे; आणि 'शकेन्द्र शब्दाचें हें नवीन अर्थदर्शन अत्यंत महत्त्वाचें आहे असें कोणीहि मान्य करील' अशी स्वत:ची पाठहि थोपटली आहे. ! 'गतानि वर्षाणि शकेन्द्रकालात्' इत्यादि श्लोकांत शकेन्द्रकाल म्हणजे युधिष्ठिरशक घेतल्यास अर्थ जमत नाही म्हणून 'युधिष्ठिरशकांतून' असें न समजतां 'युधिष्ठिरशकाच्या अंतापासून म्हणजे शालिवाहन शकाच्या आरंभापासून' असा अर्थ घ्या असे ते सांगतात! इतकें करूनहि 'द्व्यूनं शकेन्द्रकालं पञ्चभिरुद्धृत्य शेषवर्षाणाम्' इत्यादि श्लोकांत तो अर्थ जमत नाही ही अडचण राहतेच! 'येथेहि त्या शब्दाचा अर्थ वेगळा नाही' असें ते म्हणतात, पण तें कसें तें सांगत नाहीत.

## युधिष्ठिरशकाचा अंत झाला नाही

(१) युधिष्ठिरशकाचा शेवट होऊन शालिवाहनशकाचा आरंभ खिस्तोत्तर पहिल्या शतकांत झाला. या अभिनव सिद्धान्ताला आधार पूर्वोक्त 'त्रीणि शतानि कलेर्गोऽगैकगुणा: शकान्तेऽब्दा:' हा आर्यार्ध होय. प्रा. शेंबवणेकर या पंक्तीचा अर्थ 'शकाच्या अंतीं कलियुगाचीं ३१७९ वर्षे झालीं' असा करतात आणि त्यावरून युधिष्ठिराच्या कालगणनेला प्राचीनकाळीं 'शक' म्हणत असत असें अनुमान करतात. पण युधिष्ठिर शकाचा अंत कां झाला हें ते सांगत नाहीत. दक्षिणेंत त्या वर्षगणनापद्धतीचा अंत झाला नसून ती खिस्तोत्तर सातव्या शतकांतहि प्रचलित होती हें ऐहोळे शिलालेखांतील 'त्रिंशत्सु त्रिसहस्रेषु भारतादाहवादितः । सप्ताब्दशतयुक्तेषु गतेष्वब्देषु पंचसु ॥' या श्लोकावरून स्पष्ट आहे. यानंतरच्याच श्लोकांत 'पञ्चाशत्सु कलौ काले षट्सु पञ्चशतासु च । समासु समतीतासु शकानामपि भूभुजाम् ॥' असा शकांच्या (शालिवाहनांचा नव्हे) कालगणनेचा उल्लेख आहे. तेव्हा खिस्तोत्तर सातव्या शतकांत दक्षिणेंत दोन्ही कालगणनापद्धति प्रचलित होत्या हें उघड आहे. एक जाऊन तिच्या जागीं दुसरी आली, असें नाही.

### ब्रह्मगुप्ताच्या पंक्तीचा खरा अर्थ

पण मग 'त्रीणि शतानि कलेर्गोऽगैकगुणाः शकान्तेऽब्दाः।' या पंक्तींतील शकान्ते याचा अर्थ काय, असा प्रश्न उपस्थित होतो. त्याचें उत्तर सोपें आहे. शकान्ते म्हणजे 'शककालसमीपे' शकांचा संवत् सुरू झाला तेव्हा. शककालाच्या (सध्याच्या शालिवाहन शकाच्या) आरंभीं युधिष्ठिरशकाचीं (किंवा कलियुगाचीं) ३१७९ वर्षें झालीं ही प्रचलित समजूत त्यांत उल्लेखिली आहे. 'अन्ते' याच्या 'समीप' या अर्थाकरिता 'नाधीयीत श्मशानान्ते ग्रामान्ते' (मनुस्मृति, ४, ११६) इत्यादि उदाहरणें आपट्यांच्या कोशांत दिलीं आहेत तीं पाहावीं.

### सातवाहनांनी शक स्थापिला नव्हता

(२) 'युधिष्ठिरशकाचा शेवट झाल्यावर सातवाहनांनी आपला शक स्थापिला' या शेंबवणेकरांच्या दुसऱ्या अभिनव सिद्धान्ताचें आता परीक्षण करूं.

पुराणांतील वर्णनाप्रमाणे शुंग व काण्व राजांनंतर आंध्रांनी (सातवाहनांनी) आपलें राज्य स्थापिलें. पण मौर्यांनंतर मध्यंतरीच्या काळांत दक्षिणेंत कोणाचा अंमल होता याचा पत्ता लागत नाही. शिवाय हींच पुराणें आंध्र राजांनीं ४६० वर्षें राज्य केलें असेंहि सांगतात. आंध्रांचा विनाश सन २५० च्या सुमारास झाला हें अनेक प्रमाणांवरून दाखवितां येतें. तेव्हा आंध्राचा उदय खिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या शेवटीं झाला असें मानलें पाहिजे. पुराणांत म्हटल्याप्रमाणे ते शुंग व काण्व राजांनंतर उदयास आले असें मानलें तरी त्यांचा उदयकाल खिस्तपूर्व ३०' या वर्षाच्या सुमारास झाला होता असें मानावें लागेल. अर्थातच ते खिस्तोत्तर ७८ या वर्षी सुरू होणाऱ्या शककालाचे संस्थापक असणें शक्य नाही

याशिवाय या अनुमानावर बलवत्तर आक्षेप हा की, आंध्रांनी किंवा सातवाहनांनी युधिष्ठिरशकाची समाप्ति करून आपला शक (किंवा संवत्) स्थापलो याला यत्किंचितहि प्रमाण नाही. त्यांनी असा संवत् स्थापला असता तर त्याचा उपयोग त्यांनी स्वतःच्या कोरीव लेखांत अवश्य केला असता. सातवाहनांचे अनेक कोरीव लेख प्रथम पश्चिम महाराष्ट्रांत व नंतर आंध्रांत सापडले आहेत; पण त्यांतील वर्षे त्या त्या राजांच्या राज्यारंभापासून दिलेलीं आहेत. त्यांत कोणत्याहि शकाचा उल्लेख नाही. तेव्हा सातवाहनांच्या शकाला शशशृंगाप्रमाणे मुळींच अस्तित्व नाही.

### सातवाहनांनी काश्मीरांत शालिवाहन शक नेला नाही

(३) काश्मीरचे राजे दक्षिणेंतील सातवाहनांच्या वंशांतले खरोखरच होते काय याचा संशय आहे. कारण दोघांच्या कालांत सातआठशे वर्षांचें अंतर आहे. पण ते दक्षिणेच्या सातवाहन वंशाच्या एखाद्या शाखेंतील होते असें मानलें तरी त्यांनी काश्मीरांत शककालाचा प्रचार केला असण्याचा मळीच संभव नाही. कारण तो शक त्यांचा नव्हताच आणि त्याचा उपयोग त्यांनी स्वतःच्या लेखांत मुळीच केलेला दिसत नाही.

### उत्तरेंतील शककाल दक्षिणेंत कसा पसरला?

(४) शकवर्षगणना कनिष्काने स्थापिली असें मत आता बहुतेक विद्वानांना मान्य झालें आहे. कनिष्काचें राज्य उत्तर भारताच्या विस्तृत प्रदेशावर पसरलें होतें, त्यामुळे

त्याच्या शकाचा प्रसार गुप्तपूर्वकालांत उत्तर भारतांत पंजाबपासून सांचीपर्यंत झाला होता*. त्याच्या वंशजांनी व क्षत्रपांनी ( प्रांताधिपतींनी ) त्याचा उपयोग आपापल्या लेखांत केला आहे. महाराष्ट्रांतील क्षत्रप नहपान व त्याचा जामात उषवदात आणि काठेवाडांतील चष्टन व त्याचे वंशज यांच्या कोरीव लेखांत व नाण्यांवर याच संवताचीं वर्षे उल्लेखिलीं आहेत. हे क्षत्रप शकवंशी होते. सातवाहननृपति गौतमीपुत्राने नहपानाचा पाडाव करून त्यांना महाराष्ट्रांतून पिटाळल्यावर त्यांनी माहिषक प्रदेशांत ( दक्षिण हैदराबाद व पश्चिमेचा कानडी मुलूख यांत ) आपलें राज्य स्थापलें. या वंशांतील शकनृपति मान याचीं नाणीं हैदराबाद प्रदेशांत सापडलीं होतीं तीं आम्हीं प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांची घडण सातवाहनांच्या नाण्यांप्रमाणे असून कांहींवर त्याची 'महासेनापति' ही पदवी व इतर कांहींवर 'राजन्' ही पदवी उल्लेखिली आहे. तसेंच त्यांवर त्याच्या शकवंशाचा निर्देश असून कांहींवर वज्र व बाण हीं शकांच्या नाण्यांवरचीं चिन्हें उमटविलीं आहेत. हा मान नृपति मोठा बलाढ्य होता. त्याचा उल्लेख पुराणांतील वंशावळींत 'शकमानोऽभवद्राजा महिष्याणां महीपतिः' असा आला आहे. या शकराजाने व त्याच्या वंशजांनी कनिष्काने स्थापिलेल्या व नहपानादि त्याच्या क्षत्रपांनी स्वीकारलेल्या संवताचा उपयोग केला असावा. त्यानंतर उदयास आलेल्या कर्नाटकच्या पूर्व चालुक्यांनीहि आपल्या प्रदेशांत पूर्वीपासून चालू असलेल्या शकसंवताचा आपल्या लेखांत उपयोग केला असें दिसतें. सातवाहनांनंतर महाराष्ट्रांत आभीरांचें राज्य झालें. त्यांनी स्थापिलेल्या संवताचा (ज्याला कालान्तराने कलचुरि किंवा चेदि संवत् असें नांव पडलें त्याचा) पश्चिम महाराष्ट्र, विदर्भ, गुजराथ, कोकण वगैरे प्रदेशांत प्रसार झाला. पण चालुक्यांनी पश्चिम महाराष्ट्र, विदर्भ, गुजराथ वगैरे प्रदेशांवर आपली सत्ता पसरविल्यावर तेथील आभीर संवताची पीछेहाट होऊन शकसंवताचा प्रसार झाला. नंतर तो आंध्रांतहि पसरला. पुढे बंगाल, आसाम वगैरे प्रदेशांत दक्षिणेतील राजांचें वर्चस्व स्थापित झाल्यावर शकसंवताचें क्षेत्र आणखी वाढलें. कालान्तराने या संवताचा शालिवाहनाशीं संबंध जोडण्यांत आल्यावर त्याला 'शालिवाहन' हें नांव प्राप्त झालें. त्याचा पहिला ज्ञात उल्लेख यादव नृपति कृष्णाच्या तासगांव ताम्रपटांत आढळतो. पुढे तर तो शकांनी स्थापला होता याची स्मृतिहि राहिली नाही. याप्रमाणे 'उत्तरेंत स्थापिलेला शक सर्व दक्षिण भारत अखंडितपणे व्यापून आजवर कसा टिकून आहे' या कूट प्रश्नांचें उत्तर आहे. ऽ

याप्रमाणे सध्या भारतशासनाने स्वीकारलेला संवत् परकी राजांनी स्थापिला असला तरी त्याचा उपयोग करण्यांत आपण कमीपणा मानण्याचें कारण नाही. आपले पूर्वज अशा कोत्या बुद्धीचे नव्हते. ग्रीकांची ज्योतिषशास्त्रांतील प्रगति पाहिल्यावर गर्गाचार्यांनी त्यांच्याविषयी खालील उद्गार काढले होते :

म्लेच्छा हि यवनास्तेषु सम्यक् शास्त्रमिदं स्थितम् ।
ऋषिवत्तेऽपि पूज्यन्ते किं पुनर्देवविद्द्विजः ॥ ● ● ●

---

* पुढे गुप्त संवताचा प्रसार होऊन या शकाची पीछेहाट झाली.

ऽ याविषयी सविस्तर विवेचन संशोधन-मुक्तावलि, सर पहिला यांतील 'शालिवाहन शकाची पूर्वपीठिका' आणि सर ३ मधील 'महाराष्ट्रांतील प्राचीन शकराजवंश' हे लेख पाहा.

# साहित्य-समीक्षा

## संशोधन–मुक्तावलि

महामहोपाध्यायांचा संशोधनात्मक लेखांचा हा तिसरा संग्रह. यापूर्वीच्या दोन्ही सरांचें स्वागत विद्वानांनी केलेलें आहेच व तेंच स्वागत या तिसऱ्या सराचें होईल यांत मुळीच शंका नाही. आजकालच्या संशोधकांत, भारतीय इतिहासाच्या अभ्यासकांत नानासाहेबांचें स्थान फार वरचें असून या क्षेत्रांत त्यांचा अधिकार व व्यासंग हीं फार मोठीं आहेत. याचीच साक्ष भुवनेश्वरी येथे भरणाऱ्या येत्या प्राच्यविद्यापरिषदेने त्यांची अध्यक्षपदीं निवड करून पटवून दिली आहे. भारतांतील प्राच्यविद्यापरिषदेने नानासाहेबांच्या संशोधन-कार्याचा केलेला हा गौरव उचितच आहे याविषयीं दुमत व्हावयाचें नाही.

त्यांच्या लेखनाचीं वैशिष्ट्यें म्हणजे प्रसादपूर्ण शैली, अभिजात रसिकता व सूक्ष्म चिकित्सक दृष्टि हीं होत. परिचित विषयावर नवीन प्रकाश टाकणें वा अपरिचित विषय प्रथमच प्रकाशांत आणणें हेंच कार्य त्यांच्या लेखांनी केलें असल्याचें दिसून येईल. हीं सारीं वैशिष्ट्यें या प्रस्तुतच्या सरांत सर्वत्र आढळतात. कालिदास, भवभूति, प्राचीन विदर्भ, महाराष्ट्रांतील प्राचीन शक राजवंश, हूण, विजेता यशोवर्मन, मानपुरचे राष्ट्रकूट, सुगतिपाचा चिंचणी ताम्रपट, परमार जगदेव याचा डोंगरगाव शिलालेख या अशा भिन्नभिन्न विषयांवरील अभ्यासपूर्ण लेख यांत आले आहेत.

कालिदासाच्या कालनिर्णयासंबंधींचा लेख म्हणजे श्री. करंदीकरांच्या 'खिस्तपूर्व प्रथम शतक उपपत्तीला' दिलेलें उत्तर होय. अजून सर्वमान्य अशी उपपत्ति मांडण्यांत आलेली नाही व अगदी निर्णायक असा पुरावा उपलब्ध होत नाही. अशा परिस्थितींत जास्तींत जास्त सयुक्तिक अशी कोणची बाजू वाटते, कोणच्या बाजूस उपलब्ध पुराव्यांपैकी अधिकांत अधिक पुराव्याचा पाठिंबा आहे हेंच पहावें लागतें. यांत वादाकरिता वाद मांडूनहि चालत नाही. पण नित्य नवे आक्षेप आल्याने व त्या आक्षेपांचें निरसन झाल्याने बाजू अधिक बळकट होत जाते. या न्यायाने पाहिल्यास 'गुप्तकाल उपपत्ति' बरीच मान्य होत चालली आहे यांत शंका नाही. ही उपपत्ति परिश्रमाने वारंवार मांडण्याचें श्रेय नानासाहेबांना जरूर द्यावयास हवें.

भवभूति व उम्बेक यासंबंधींचें कोडें अजून उलगडलेलें नाही असेंच म्हणावें लागेल. संस्कृत ललित वाङ्मय व तत्त्वज्ञानात्मक वाङ्मय यांच्यांत एक विस्मयकारक फारकत दिसून येते. या दोन्ही प्रांतांत लेखन केलेल्या ग्रंथकाराचें नांव निश्चयात्मक रीतीने घेतां येत नाही; पण दंतकथा, आख्यायिका, उल्लेख मात्र मिळतात. कालिदास हा ईश्वरकृष्ण होय, शंकराचार्य अमरु होत. तशाच प्रकारचा प्रस्तुतचा प्रश्न होय. या असल्या आख्यायिकांवर विश्वास ठेवण्याचा मोह होतो; कारण या दोन क्षेत्रांचा संगम होणें, एखाद्या ग्रंथकाराने दोन्ही

---

**संशोधन-मुक्तावलि** – ( सर तिसरा ) – [ लेखक : **म. म. वा. वि. मिराशी;** विदर्भ संशोधन मंडळ ग्रंथमाला नागपूर १; मूल्य ४ रु. ]

अनुक्रमणिका

क्षेत्रांत लेखन करणें हें योग्य व शक्य वाटून जातें. तत्त्वज्ञानात्मक लेखन करणारांनी विरंगुळा म्हणून सुद्धा का ललितवाङ्मयाकडे दृष्टिक्षेप टाकला नसेल ? पण वाटणें निराळें व सिद्ध होणें निराळें. पुराव्याच्या अभावीं या समस्या अशाच अनिर्णीत राहणार हें उघड आहे.

तशी परिस्थिति मात्र भवभूतीच्या 'पद्मपुर व कालप्रियानाथा' विषयीं नाही. नानासाहेबांनी एकूण एक खुणा जमवून पटवून दाखविल्या आहेत व त्या स्थळाचा नकाशाच डोळ्यांसमोर उभा केला आहे. या स्थळनिर्णयाविषयी दुमत होण्याचें कारणच नाही. 'प्राचीन विदर्भ' या लेखांत विदर्भाची प्राचीनता व राज्यशासन, साहित्य व कला या क्षेत्रांत विदर्भाने केलेल्या प्रगतीचें साधार असें विवेचन करून मूल्यमापन केलें आहे. फर्ग्युसन, कनिंगहॅम, रा. ब. हिरालाल यांच्या मतांचा परामर्श घेऊन दक्षिण कोसलची राजधानी श्रीपुरच असली पाहिजे असें त्याविषयीच्या लेखांत प्रतिपादिलें आहे. पृथ्वीराज-विजयांतील कलचूरीविषयक उल्लेखांत आलेल्या 'वामदेवपादानुध्यात' या संदिग्ध पदाच्या अर्थाचें विवेचन करून नानासाहेबांनी नवाच निर्णय केला आहे. वामदेव हा गुरु नसून राज्यप्रस्थापक होता असें मत त्यांनी मांडिलें आहे. चिंचणी ताम्रपटाच्या विवेचनांत अरब अधिपति व आपली संस्कृति यावर महत्त्वाचा प्रकाश टाकिलेला आहे. गौड ब्राह्मण, कर्णाट-कीय ब्राह्मण, कऱ्हाडे ब्राह्मण यांच्याविषयींचे उल्लेख मनोरंजक आहेत (पृ. १६०). सेन्द्रक जयशक्ति याच्या मुदखेडे ताम्रपटाच्या विवेचनांत खानदेश व सेन्द्रक यांच्याविषयींचें विवेचन आहे व स्थलनिर्णय करण्याचा यत्न (पृ. १३८) केला आहे. 'सेणाणा'सारखें गांव त्या भागांत दिसत नाही असें म्हणून नानासाहेबांनी 'सौंदणें' असेल असें सुचविलें आहे. कलिवन हें कळवण तालुक्याचें मुख्य ठिकाण व कुंदलिकामल हें नांदगावजवळील कुन्दलगांव असेल तर 'सेणाणा' हें बागलाण तालुक्यांतील 'सटाणें' असेल किंवा कसें ? जुनीं नाणीं, रामटेक याबद्दलचें विवेचन असेंच साहित्य व इतिहास या दोन्ही दृष्टींनी महत्त्वाचें आहे.

प्राचीन भारताचा सुसंगत इतिहास तयार व्हावयाचा आहे. अशा परिस्थितींत जवळजवळ जिल्हानिहाय असें होणारें हे प्राचीन राजशासन व राजवंश यासंबंधीचें सारें विवेचन केवळ अमोलिक म्हणावयास हवें. याच पायावर पुढील इतिहास उभा राहणार आहे. नानासाहेबांनी विस्मृतीच्या गर्तेत गेलेले नृप व नृपवंश पुनः प्रतिष्ठेस पोचविले आहेत, प्रकाशांत आणिले आहेत. 'अनेकभ्रष्टराज्योत्सन्नराजवंशप्रतिष्ठापने'च्या कार्यामुळे नानासाहेबांचें 'यश' फार मोठें आहे असेंच प्राचीन इतिहासाचा अभ्यासक म्हणेल. ● ●

डॉ. म. गो. माईणकर

## अमरुशतकम्

'अमरुशतकम्' या शृंगाररसपूर्ण संस्कृत काव्याची प्रा. चिंतामण रामचंद्र देवधर यांनी मूळ संहिता देऊन तिचा मराठींत समश्लोकी व समवृत्त अनुवाद दिला आहे. 'अमरुशतकम्' असें जरी काव्याचें नांव असलें तरी कवीचें नांव 'अमरुक' असून श्लोक

**अमरुशतकम्** (मूळ, वृत्तात्मक भाषांतर व मराठी टीका)–[अनुवादक : **प्रा. चिंतामण रामचंद्र देवधर**; प्रकाशक : **डॉ. आर्. एन्. सरदेसाई**, ओरिएंटल् बुक एजन्सी, १५ शुक्रवार, पुणें २; मूल्य ५ रुपये.]

शतकाच्या ऐवजी १०२ आहेत. तसें पाहिलें तर अमरुकाच्या नांवाने १८८ श्लोक प्रसिद्ध असून, त्यांतून त्याचें नक्की शतक कोणतें याबद्दल संदेह उत्पन्न झाला आहे असें अनुवादकाचेंच म्हणणें आहे.

या अनुवादाचें वैशिष्ट्य असें की, प्रा. देवधर यांनी अस्सल मराठी शब्द योजून अमरुशतकाचा प्रसादयुक्त अनुवाद केला आहे हें त्यांतील कोणत्याहि श्लोकाचा अनुवाद वाचला असतां लक्षांत येईल. अर्थात्, मूळ श्लोकाचें उत्तम रसग्रहण करतां आलें तरच अनुवादाचा मार्मिक रसास्वाद घेतां येईल हें सांगणें नकोच. तरीपण नुसतें मराठी जाणणाऱ्यालाहि त्यांत बरेंच कळण्यासारखें आहे; कारण प्रत्येक श्लोकाचें, त्यांतील प्रसंगाचें, शृंगाराच्या विशिष्ट प्रकाराचें आणि नायिकेच्या स्वभाववैशिष्ट्याचें मार्मिक विवेचन संस्कृतांतील साहित्यशास्त्राच्या अनुरोधाने व अनेक टीकाकारांचें मत ध्यानीं आणून अनुवादकानें केलें आहे.

अमरुक कवि इसवी सनाच्या सातव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला असें अंतर्गत पुराव्यावरून म्हणतां येईल. कांही श्लोकांवर तत्पूर्वी होऊन गेलेल्या माघ कवीची छाया पडलेली दिसते असें कांहींचें म्हणणें आहे; पण तो प्रश्न विवाद्य आहे. तो दाक्षिणात्य असावा असाहि निष्कर्ष निघू शकतो. अमरुक कवीविषयी अनेक दंतकथा आहेत, पण त्या फारशा विश्वासार्ह नाहीत.

या ग्रंथाचें दुसरें वैशिष्ट्य ग्रंथकाराने जोडलेला उपोद्घात. हा वाचल्याशिवाय व नीट समजावून घेतल्याशिवाय, वाचकाला या अनुवादाचें सम्यक्रीतीने रसग्रहण करतां येणार नाही. हा उपोद्घात म्हणजे एक लहानसा रसविचारावरील प्रबंधच आहे. त्यांत रसविचाराबरोबर रसध्वनि, शृंगाररस, तो उत्पन्न होण्याचीं अनेक कारणें, त्याचे विप्रलंभ व संभोग हे दोन मुख्य भेद व त्यांचे पुनः अनेक पोटभेद, नायिकाप्रभेद (हे एकंदर ३८४ संभवतात) वगैरे देऊन पुढे धनंजयाच्या 'दशरूपक' या ग्रंथाच्या आधारें वृत्ति व रीति यांचा विचार केला आहे. अमरुशतक हें मेघदूतासारखें एकसंधि कथाकाव्य नसून 'मुक्तक' प्रकाराचें काव्य आहे. यांतील प्रत्येक 'मुक्तक' म्हणजे एक सूत्रमय शृंगारप्रकारावर प्रबंधच आहे आणि म्हणूनच 'अमरुकवेरेकः श्लोकः प्रबंधशतायते' असें अभिनवगुप्ताने म्हटलें आहे तें अत्यंत समर्पक होय. हें सर्व काव्य हालाच्या गाथासप्तशतीप्रमाणें शृंगाररसपूर्ण आहे व त्यांतील मर्म स्त्रीस्वभावाच्या एतद्विषयक सूक्ष्म मानसिक संवेदनाचें ज्ञान असल्याशिवाय कळणार नाही! रसिकाच्या दृष्टीने मेघदूत व अमरुशतक हीं दोन्ही काव्यें अत्युत्कृष्ट आहेत. पण मेघदूत हें कथाकाव्य असल्यामुळे अधिक लोकप्रिय झालें, तर अमरुशतक हें मुक्तक प्रकाराचें असल्याने शृंगाररसाचें सखोल ज्ञान असणाऱ्यांना अधिक आवडतें इतकेंच. पुस्तकाला अहमदाबाद येथील प्रा. रा. ब. आठवले यांनी 'प्ररोचना' (रसग्रहण) या शीर्षकाखालीं अत्यंत मार्मिक प्रस्तावना जोडली आहे. त्यांचेंहि मत वरीलप्रमाणेच आहे. त्यांत ते म्हणतात, 'हा अनुवाद वाचणाऱ्या वाचकाला शृंगाराच्या सर्व सूक्ष्म प्रकारांची यथावत् ओळख नसेल तर त्याला या मुक्तक काव्याचें संपूर्णतया रसग्रहण करणें केवळ अशक्य आहे.' विषय जरी शृंगार असला तरी भाषा प्रौढ आहे. उदाहरणार्थ,

**मूळ :**—दृष्टालग्ने पत्यौ नमयति मुखं जातविनया ।
हठाश्लेषं वाञ्छत्यपहरति गात्राणि निभृतम् ॥
न शक्नोत्याख्यातुं स्मितमुखसखीदत्तनयना ।
**ह्रिया ताम्यत्यन्तः प्रथमपरिहासे नववधूः ॥ ४१ ॥**

मराठी अनुवाद :—जधीं भर्ता ओढी पदर, विनयें वाकवि मुखा ।
वळे तो आलिंगूं बघत, हलु चोरी तनुलता ॥
धजेना सांगाया, स्मित मुखि सखींच्या बघुनियां ।
**नवोढा लज्जेने प्रथम परिहासें मनिं थिजे ॥ ४१ ॥**

शेवटच्या चरणाचा अनुवाद–विशेषत: 'ताम्यत्यन्तः' याचा–फार बहारदार झाला आहे. आता स्पष्टीकरण वाचा.

स्पष्टीकरण—प्रथम नर्मचेष्टासमयीं नववधूची लज्जा ही तिची वैरिणी कशी होते याचें येथे सुंदर वर्णन केलें आहे. तिची अधोदृष्टि, शरीरसंकोच व मौन, तसेंच व्यथित झालेलें तिचें अंतःकरण या अनुभावांनी व्रीडा हा संचारिभाव प्रतीत होऊन (दशरूपक ४–२४) संभोगशृंगाराचा परिपोष झाला आहे व उत्तरार्धांत 'विहृत' नांवाचा नाट्यालंकार आहे. 'प्राप्तकालं न यद् ब्रूयात् व्रीडया विहृतं हि तत्' अशी 'विहृत' अलंकाराची व्याख्या आहे. नायिका 'रतौ वामा' अशी नवोढा मुग्धा आहे. संभोगेच्छारूप शृंगारिनर्म आहे.

या स्पष्टीकरणांत अनुभाव, संचारिभाव, संभोगशृंगार, 'विहृत' नाट्यालंकार, 'रतौ वामा' व शृंगारिनर्म हे शब्द समजण्यास कठीण आहेत. ते प्रथम समजावून घेतले तरच श्लोकाचें मर्म कळेल.

या काव्यावर एकंदर १५।१६ टीका उपलब्ध आहेत. त्यांपैकी अर्जुनवर्मदेवाची 'रसिकसंजीवनी,' दुसरी वेमभूपालाची 'शृंगारदीपिका,' शिवाय चतुर्भुजाची 'भावचिंतामणी', सूर्यदासाची 'शृंगारतरंगिणी' व नंदलालकृत 'बालबोधिनी' या टीका प्रसिद्ध आहेत. कांहीं टीकाकारांनी या सर्व श्लोकांचें शृंगारपर व तसेंच शांतरसपरहि व्याख्यान केलें आहे तें अनुवादकास मान्य नाही. अमरुक कवीच्या शृंगाररसाने ओथंबलेल्या श्लोकांचें हें शांतपर व्याख्यान 'रहसि प्रौढवधूनां रतिसमये वेदपाठ इव' या श्लोकार्धांत म्हटल्याप्रमाणे अत्यंत हास्यास्पद आहे असें ग्रंथकाराने उपहासाने म्हटलें आहे!

तात्पर्य, प्रा. देवधरांनी मराठी भाषेंत एका नव्या अनुवादात्मक काव्याची सुंदर भर घातली इतकेंच नव्हे तर, एका नाजूक विषयावर प्रौढ भाषेंत तात्पर्यार्थ टीका लिहिली यांत नावीन्य आहे. प्रौढ रसिक वाचक त्याचा रसास्वाद घेतील अशी आशा आहे ● ● ●

म. दा. साठे, एम्. ए.

## वक्तृत्वशास्त्र

लोकशाहींत मतपरिवर्तन व त्यासाठी विचारविनिमय ही आद्य गरज असल्याने कोणत्याहि लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांला सभा आणि वक्तृत्व यांचा सोपपत्तिक विचार करणें आवश्यक ठरतें. सदर ग्रंथाचे लेखक श्री. काकासाहेब गाडगीळ यांनी यासाठीच प्रथम 'सभाशास्त्रा'वर ग्रंथ लिहिला, व आता वक्तृत्वशास्त्रावरील प्रकृत ग्रंथ ते प्रसिद्ध करीत आहेत, हें योग्यच झालें. कारण सभा व वक्तृत्व यांचा अन्योन्यसंबंध तंत्र-मंत्रांसारखा आहे.

सदर ग्रंथांत वक्तृत्व या विषयाचा पुढील आठ प्रकरणांतून सांगोपांग आणि सविस्तर विचार करण्यांत आला आहे:–१ वक्तृत्वाचें आधुनिक महत्त्व, २ प्राथमिक तयारी, ३

**वक्तृत्वशास्त्र** – कला-तंत्र-मन्त्र – [ लेखक : श्री. न. वि. गाडगीळ; प्रकाशक : श्री. वि. दामले, बी. कॉम्., एन्. के. पब्लिशिंग हाऊस, ६२७ बुधवार पेठ, पुणें २; मूल्य ६ रुपये. ]

भाषणाची तयारी, ४ भाषण, ५ वक्ता–मन व शरीर, ६ शब्द व शैली, ७ भाषण-प्रकार व प्रसंग आणि ८ सभा-नियमन व संचालन.

श्री. काकासाहेब गाडगीळ हे स्वतः एक नाणावलेले वक्ते, चांगले वकील आणि मुरलेले राजकारणी असल्याने वक्तृत्वाचीं सर्व क्षेत्रें त्यांच्या पूर्व परिचयाचीं आहेत. त्यांपैकी बऱ्याच क्षेत्रांत त्यांनी स्वतः भाग घेतलेला आहे. त्यामुळे त्यांच्या प्रतिपादनाला प्रचीतीचा ठामपणा आलेला आहे, ही गोष्ट पानापानावर जाणवते. 'वक्तृत्वशास्त्रा'वर लिहावयाचें म्हणून त्यांनी शास्त्रचर्चेचें अवडंबर माजविलें नाही, अवतरणांचा झंझावाती पाऊस पाडला नाही की वक्त्यांचा नसता बडेजाव केला नाही. अर्थात्, वक्तृत्वाच्या शास्त्रीय विवेचनाला जीं सर्व अंगें व उपांगें लागतात तीं सर्व यांत आलीं आहेत, पण तीं गाजावाजा न करतां, घरगुती, खेळीमेळीच्या पद्धतीने. काकासाहेबांचें ग्रंथलेखनहि आजवर विपुल झालेलें आहे. त्यामुळे वक्तृत्वक्षेत्रांतील आत्मप्रत्यय आणि ग्रंथलेखनांतील सफाई यांचें प्रतिबिंब त्यांच्या शैलींत उमटलेलें आहे. त्यांची भाषा घरगुती, वाक्यें छोटीं, कोणाला तरी जवळ बसवून घेऊन व त्याच्याशीं गुजगोष्टी करतांना उच्चारावींत तशीं साधीं आहेत. वक्तृत्वाच्या प्रकारांची माहिती देतांना ती इतकी तपशीलवार, जिव्हाळ्याने आणि साक्षेपाने दिली आहे की, लेखक शिक्षकाची भूमिका घेऊन आपल्या विद्यार्थ्यांस वक्तृत्वाचे प्रत्यक्ष पाठच देत असल्याचा भास होतो. 'भाषण' व 'भाषणाची तयारी' हीं प्रकरणें तर तपशीलवार पाठासारखींच वाटतात. त्यांत दिलेल्या विषयांवर (जागतिक परिस्थिति) व्याख्यानाचे मुद्दे सुद्धां काढून दिलेले आहेत (पान २७). कोणत्या शब्दांचे उच्चार कसे करावे हें उच्चारशास्त्रान्वये सविस्तर सांगितलें आहे (पान ६०-६२) वक्त्याने दृष्टि कशी लावावी, शरीराची हालचाल कशी करावी इत्यादींबद्दलहि बारीकसारीक सूचना साक्षेपाने दिल्या आहेत.

वर सांगितल्याप्रमाणे लेखकास वक्तृत्वक्षेत्रांत पुष्कळ अनुभव आहे हें खरें असलें तरी तेवढ्यावरच ते अवलंबून राहिले नाहीत. त्यांनी इंग्रजी भाषेंत उपलब्ध असलेल्या वक्तृत्वावरच्या अनेक ग्रंथांच्या वाचनाचा विपुल उपयोग ग्रंथभर केला आहे. यासाठी त्यांनी ग्रंथाच्या अखेर दिलेली संदर्भ-ग्रंथांची विस्तृत यादी अवश्य पाहण्यासारखी आहे.

सारांश, सर्व क्षेत्रांतील वक्तृत्वाच्या प्रकारांवर अत्यन्त भरपूर—कित्येक वेळां नको इतकी विपुल वाटणारी—माहिती देणारा हा डेमी आकाराच्या सव्वादोनशे पानांचा ग्रंथ मराठी भाषेंत स्वागतार्ह आहे. वक्तृत्वावर मराठी भाषेंतील अगदी जुजबी लिखाण लक्षांत घेतलें तर या भरघोस विवेचनाचें महत्त्व अधिकच लक्षांत भरेल. ● ● ●

के. ना वाटवे

## ज्युलियस सीझर

'ज्युलियस सीझर' या शेक्सपियरच्या सुप्रसिद्ध शोकांतिकेचा अनुवाद उदगीरच्या सरकारी हायस्कूलमधील श्री. माणिक नारायण कुलकर्णी यांनी केला आहे, व तो सरस उतरला आहे. शेक्सपियरचें हें मूळ नाटक बरेंच गाजलेलें व सुज्ञ रसिकांना परिचित असेंच आहे. त्याची निवड करून तें मराठी रूपांत श्री. कुलकर्णी यांनी ठाकठीक उभें केलें आहे.

**ज्युलियस सीझर – [ अनुवादक : श्री. माणिक नारायण कुलकर्णी; प्रकाशक : पंडित अनन्त कुलकर्णी; मूल्य २॥ रु. ]**

मराठी ऐतिहासिक नाटकांच्या भाषाशैलीची जी एक विशिष्ट परंपरा रूढ आहे तिचाच अवलंब करून या नाटकांतील संवाद अनुवादित करण्यांत आले आहेत. ते वाचतांना मधून मधून खाडिलकरांच्या किंवा वीर वामनराव जोशी यांच्या ओजस्वी भाषाशैलीची आठवण कोणालाहि व्हावी.

अनुवाद करतांना नाटकांतील निरनिराळ्या व्यक्तींचीं नांवें व कांही रीतिरिवाजदर्शक शब्द इंग्रजीप्रमाणेच ठेवले आहेत. अनुवाद वाचीत असतांना मुळांतील प्रदीर्घ भाषणांचा व स्वगतांचा मराठी पेहराव विशेष कोठे खटकत नाही व लेखकाच्या अनुवाद-कौशल्याचें कौतुकच वाटतें. भाषेवर लेखकाचें प्रभुत्व आहे याचा प्रत्यय वारंवार येतो.

ज्युलियस सीझर या नाटकांतील ओजोगुणाने रसरसलेलीं मूळचीं भाषणें अनुवादांतहि मनावर यथोचित परिणाम केल्याशिवाय राहत नाहीत. उदाहरणार्थ, तिसऱ्या अंकाच्या पहिल्या प्रवेशांतील ॲंटनीचें स्वगत भाषण वाचण्याजोगें आहे. तसेंच तिसऱ्या अंकांतील ॲंटनीचीं, सीझरचें शव सभास्थानीं आणून त्यासमोर केलेलीं सर्वच भाषणें सूक्ष्म वक्रोक्ति व उपहास यांनी भरलेलीं असल्यामुळे तीं अनुवादित करणें ही अनुवादकाचें कौशल्य पणास लावणारी गोष्ट आहे. श्री. कुलकर्णी यांनी हीं भाषणेंहि रसोत्कर्ष साधेल अशा पद्धतीने व गद्यांतील विशिष्ट लय साधून अनुवादित केलीं आहेत.

अंक तिसरा प्रवेश दोन मधील सार्वजनिक सभास्थानीं ब्रूटसने केलेलीं भाषणेंहि कुलकर्णी यांनी बऱ्या पद्धतीने अनुवादित केलेलीं आहेत. ते शब्दाशब्दांच्या व वाक्यावाक्यां-च्या भाषांतरापेक्षा स्वैर अनुवादपद्धतीकडेच अधिक झुकले आहेत. शेक्सपियरसारख्या नाट्यप्रभूचें नाटक अनुवादित करतांना मूळच्या अर्थसौंदर्याला व भावव्यक्तीला आदर्श अनुवादकाने यत्किंचितहि धक्का लागू देतां कामा नये. शेक्सपियरला जें म्हणावयाचें होतें आणि जसें म्हणावयाचें होतें तें शक्यतों त्याच्याच कल्पनेप्रमाणें अनुवादांतहि कायम राहावयास हवें. मराठीमध्ये यापूर्वी ज्युलियस सीझर या नाटकाचे दोन तरी अनुवाद प्रसिद्ध झालेले दिसतात. १८८०-९० च्या सुमारास शेक्सपियरच्या नाट्यकृति मराठींत आणण्याची हौस अनेकांनी दाखविली. श्री. के. भि. बेलसरे यांनी केलेल्या भाषांतराशीं प्रस्तुत अनुवादाची तुलना करून पाहिली असतां हा अनुवाद अधिक रसमय झाला आहे हें पटतें; मात्र कांही स्थळीं लेखकाने जें विस्ताराचें स्वातंत्र्य घेतलें आहे त्याबाबत रसिकांचें दुमत होणें शक्य आहे.

शेक्सपियरचें हें नाटक त्याच्या रोमन नाटकांपैकीं प्रमुख होय. रोमन इतिहासाचा आधार घेऊन शेक्सपियरने हीं नाटकें रंगविलीं आहेत व तीं त्याच्या इतर ऐतिहासिक नाटकांसारखींच कलापूर्ण आहेत. ज्युलियस सीझर या नाटकांतील व्यक्तिचित्रण मुळांत फारच चांगलें साधलेलें आहे. ज्युलियस सीझर हा रोमन लोकसत्ताकाचा प्रमुख बनतो. महत्त्वाकांक्षी असल्यामुळें सीझर सत्तांध बनून लोकसत्तेचा नाश करील, आणि स्वतःच राज्य बळकावून आपणांस गुलामींत ठेवील, अशी भीति वाटल्यामुळे कॅशियस, कास्का यांसारखे पुढारी मत्सरग्रस्त बनून त्याचा द्वेष करूं लागले व त्यांनी सीझरला ठार मारण्याचा कट योजिला. ब्रूटस हा सीझरचा मित्र खरा, पण लोकहितासाठी म्हणून सीझरच्या वधाला तो संमति देतो. या धीरोदात्त ब्रूटसचें शेक्सपियरने रंगविलेलें व्यक्तिचित्र जगाच्या नाट्यवाङ्मयांत अजरामर ठरलें आहे. ब्रूटसचे विचार व्यक्त करणारीं मूळ नाटकांतील भाषणें श्री. कुलकर्णी यांनी रसपरिपूर्ण अशा भाषाशैलींत अनुवादित केलीं आहेत.

शेक्सपियरची ही नाट्यकृति मराठींत उतरविण्याचा प्रस्तुत प्रयत्न बराचसा यशस्वी झाला आहे असें म्हणावयास हरकत नाही. अर्थात्, कांही कांही ठिकाणीं लेखकाने बरेंच अनु-

वादस्वातंत्र्य घेतलें आहे. मुळांत एखादा शब्द किंवा एखादेंच वाक्य असेल तेथे केव्हा केव्हा अनुवादकाने थोडा सविस्तर अनुवाद केला आहे, यामुळे कांटेकोरपणाने पाहणारास कोठे क्वचित् रसभंग झाल्यासारखा वाटेल; परंतु सर्वसामान्य दृष्टीने पाहिल्यास या नाटकाचें वाचन मराठी वाचकांस फारसें खटकूं नये.

महत्त्वाचे संवाद व त्यांतील विशिष्ट वाक्यें यांचा अनुवाद करतांना लेखक मूळकृतीशीं समरस झाल्याचा प्रत्यय हा अनुवाद वाचतांना वारंवार येतो. या समरसतेमुळेच या नाट्यकृतींत कडोविकडीचे संवाद व त्यांतून प्रकट होणारें उत्कट भावचित्रण पानोपानीं आढळून येतें.

वाचक नाट्यप्रसंगांतील विविध भावभावनांशीं समरस व्हावा एवढी शक्ति या अनुवादांत आहे यांत शंका नाही. एका सुंदर नाट्यकृतीची ओळख मराठी वाचकांस लेखकाने हौसेने व चतुराईने करून दिल्याबद्दल कोणीहि त्यास धान्यवाद देईल. ● ● ●

वि. म. कुलकर्णी

## बारा बलुतेदार

एका वेळीं मराठी वाङ्मयांत ग्रामीण जीवनाचें जें चित्र रेखाटलें गेलें त्यांत वास्तवापेक्षा स्वप्नरंजनच अधिक होतें. खेड्यांतील जनतेबद्दलचा सहानुभूतीचा हा उमाळा पुढे कमी झाला व व्यंकटेश माडगुळकरांनी आपल्या सामर्थ्यवान् लेखणीने माणदेशी माणसांचें खरेंखुरें दर्शन घडविलें. खेड्यांतील इरसालपणा व विशिष्ट विनोदबुद्धि यांचा आविष्कार द. मा. मिरासदारांच्या कथांतून झाला. शंकरराव खरातांच्या " बारा बलुतेदारांचें " वैशिष्ट्य यापेक्षा निराळें आहे. सामाजिक दृष्टिकोनाची जाणीव खरातांना पुरेपूर आहे व त्यांनी ज्या व्यक्ति रेखाटल्या आहेत त्या नुसत्या जगत नाहीत, तर जगतांना सोसावें लागणारें दुःख कमी व्हावें ही त्यांच्या मनाची स्वाभाविक आकांक्षा सतत व्यक्त होते. माडगुळकरांच्या माणसांनी बहुधा आहे त्या परिस्थितीचा स्वीकार केलेला आढळतो; पण खरातांच्या माणसांच्या मनांत अपमानाची सल सतत राहते. प्रामाणिकपणें कष्ट करीत असतांना आपल्या जीवनाच्या सामान्य गरजाहि भागत नाहीत यामुळे तीं माणसें असंतुष्ट असतात व कांही वेळां परिस्थितीच्या भिंतीवर डोकें आपटायलाहि तयार होतात. प्रतिकूल शक्तींशीं झगडतांना हीं माणसें रक्तबंबाळ होतात, पण या त्यांच्या जखमांतून जो झुंजारपणा व्यक्त होतो तो अतिशय हृद्य असतो. महार, मांग, रामोशी, परीट या सगळ्या मराठी माणसांचा चिवटपणा श्री. खरात यांनी या व्यक्तिचित्रांतून प्रभावीपणें मांडला आहे.

उद्ध्वस्त होत जाणाऱ्या समाजरचनेंत बलुतेदारांच्या वांट्याला काय सुखदुःखें येतात, दारिद्र्यामुळे त्यांचें जीवन सतत डागळलेलें कसें असतें, त्यांच्या मनांतील सद्भावनेचे पाझर कां आटतात, वैतागाच्या भरांत त्यांच्या हातून अविचार कसा घडतो, परिस्थितीच्या रखरखाटामुळे त्यांच्या जीवनांतील कोमलतेचे अंकुर कसे करपतात व हीं माणसें रापून चिंबून गेलीं तरी त्यांची जगण्याची धडपड कशी चालू राहते–हें सर्व दाखवण्यांत श्री. खरात हे यशस्वी झाले आहेत. समाधानाची गोष्ट म्हणजे तीव्र सामाजिक ध्येयवाद असूनहि श्री. खरात यांनी कोठेंहि व्याख्यानबाजी केलेली नाही. त्यांनी जें जीवन पाहिलें, ज्या जीवनांतच ते वाढले,

बारा बलुतेदार – [ लेखक : राव खरात; प्रकाशक : ठोकळ प्रकाशन मूल्य ३ रुपये ]

तें रंगवितांना कोठे भावनावशतेचा भडक रंग नाही अगर प्रचारांचा अभिनिवेश नाही. भाषा त्याच जीवनांतली आणि प्रसंग तर तिथलेच. या व्यक्तिचित्रांपैकी नेकीने जगण्यासाठी धडपडणारा 'आबा रामोशी', परिस्थितीपुढे हार खाल्लेला 'नाना न्हावी', धूर्त हिकमती 'पांडू लोहार' आणि नवें क्षितीज शोधणारा 'दादू परीट' या व्यक्ति वाचकांच्या स्मरणांत दीर्घकालपर्यंत राहतील. रामा महाराचें दुःख कोणाचेंहि अंतःकरण पिळवटून टाकील. रूढीचा पगडा अद्याप खेड्यांत किती जबरदस्त आहे, गावगुंडीमुळे कांही अश्राप माणसांचा कसा बळी पडतो, सरकारी यंत्रांत निरपराधी जीव कसे भरडले जातात हें श्री. खरात यांनी 'माळेगांवचा कोळी', 'ताम्या सुतार' या व्यक्तिचित्रांच्या द्वारा दाखविलें आहे. अगदी मोजक्या शब्दांत व्यक्तिचित्र एकदम उठावदार करण्याचें सामर्थ्य श्री. खरात यांच्या लेखणींत अद्याप यावयाचें असलें तरी या संग्रहामुळे त्यांच्या भावी लेखनाविषयी मोठ्या अपेक्षा मराठी वाचकांच्या मनांत निर्माण होतील इतकी गुणवत्ता या व्यक्तिचित्रांच्या संग्रहांत आहे. ● ● ●

ग. प्र. प्रधान

# नवीन सभासद

**हितचिंतक**

१. श्री. श्री. य. कुलकर्णी ( बबनराव नावडीकर ) पुणें २.

**तहहयात**

१. श्री. रा. ग. भटकळ, मुंबई ७.
२. श्री. वि. रा. डोंगरे, मुंबई १.
३. श्री. ल. स. केळकर, पुणें २.
४. प्रि. स. वा. कोगेकर, पुणें ४.
५. श्री. वा. ह. देशपांडे, मुंबई ६.

**साधारण**

१. श्री. मा. ह. टिळक, चेंबूर ( मुंबई ).
२. श्री. वि. शं. गौतम, गंगाखेड (परभणी).
३. श्री. वेणू शामराव अरगडे, पुणें २.
४. श्री. शिवाजी रामचंद्र फाटक, कल्याण.
५. श्री. शांतिलाल छोटालाल शहा, पुणें २.
६. श्री. बाळकृष्ण सदाशिव गोखले, मुंबई १६.
७. श्री. रघुनाथराव भीमराव कुशिरे, पुणें ६.
८. श्री. अनंत त्र्यंबक पाटील, शेंदुर्णी ( पू. खा. ).
९. श्री. दिनकर साक्रीकर, मुंबई १.
१०. श्री. एन्. एस्. शिंपी, शिरसगांव ( पू. खा. )
११. श्री. शांताराम महादेव कशाळीकर, पुणें २.
१२. कु. कुसुम ना. संकपाळ, पुणें ३.
१३. श्री. विष्णु दत्तात्रय देवघर, पुणें २.
१४. श्री. स्वामी अमलानंद प्रभु, पुणें २.
१५. श्री. बाबूराव कृष्णराव गलगली, पुणें २.
१६. श्री. भालचंद्र विनायक लिमये, पुणें २.
१७. कु. प्रमोद नारायण गोखले, पुणें २.
१८. श्री. उमाकान्त ठोमरे, बोरिवली ( मुंबई ४८ ).

---

# परिषद्‌वार्ता

( चिटणिसांकडून )

**स्मृतिदिनः**—कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त सोमवार दि. २० जुलैला **प्रा. हेमन्त इनामदार** (एस्. एन्. डी. टी. कॉलेज, पुणें ४) यांचें ' कै. वा. म. जोशी यांच्या कादंबऱ्या ' या विषयावर व्याख्यान झालें.

**मुख्य मंत्र्यांची भेटः**—मुंबई राज्याचे मुख्य मंत्री **श्री. यशवंतराव चव्हाण** यांनी, खास आमंत्रणावरून, परिषदेस शनिवार दि. १८ जुलै रोजीं भेट दिली. कार्याध्यक्ष **श्री. य. दि. पेंढरकर** यांनी श्री. चव्हाण यांचें स्वागत केलें व परिषदेच्या कार्याविषयी त्यांना माहिती सांगितली. श्री. चव्हाण यांनी उत्तरादाखल भाषण केल्यावर अध्यक्ष **प्रा. श्री. के. क्षीरसागर** यांनी त्यांचे आभार मानले. नंतर उपस्थित साहित्यिकांच्या समवेत अल्पोपाहाराचा कार्यक्रम झाला. मुख्यमंत्र्यांनी पुणें विभागांत प्रसिद्ध होणाऱ्या वृत्तपत्रांच्या व नियतकालिकांच्या संपादकांची एक अनौपचारिक बैठक २० जुलैला पुणें येथे बोलाविली होती. सदर बैठकीला ' पत्रिके'चे संपादक श्री. **वा. रा. ढवळे** उपस्थित होते.

**कार्यकारी मंडळाची सभाः**—परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा रविवार दि. १६ ऑगस्टला भरली होती. डॉ. ना. गो. नांदापूरकर, श्री. वि. रा. शिंदे व श्री. वि. रा. ओक यांच्या निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यांत आला. मिरज संमेलनप्रसंगीं संमत झालेल्या साहित्यसंस्था संघीकरण खडर्यास कांहीं किरकोळ दुरुस्त्यांसह संमति देण्यांत आली. संमेलनाच्या अध्यक्षीय निवडणूकपद्धतीसंबंधीच्या ठरावाची अंमलबजावणी करण्यासाठी श्री. श्री. शं. नवरे, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. य. दि. पेंढरकर व डॉ. न. का. घारपुरे (निमंत्रक) यांची एक समिति नेमण्यांत आली. या समितीने परिषदेच्या घटनेतहि जरूर त्या दुरुस्त्या सुचवावयाच्या आहेत. परिषदेच्या तिघां विश्वस्तांपैकी प्रि. ज. रा. घारपुरे व डॉ. नि. भा. भाटवडेकर यांनी राजिनामे दिल्यामुळे ते कृतज्ञतापूर्वक स्वीकारण्यांत आले व त्यांच्याऐवजी **श्री. वि. द. घाटे** यांची विश्वस्तपदीं निवड करण्यांत आली. आतां डॉ. धनंजयराव गाडगीळ व श्री. वि. द. घाटे हे दोघेच परिषदेचे विश्वस्त आहेत.

**साधारण सभाः**—१४ जून रोजीं वेळेच्या अभावीं तहकूब झालेली वार्षिक साधारण सभा १६ ऑगस्ट १९५९ रोजीं प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेने भरली होती. मिरज साहित्यसंमेलनप्रसंगीं संमत झालेल्या ( म. सा. पत्रिका अंक १२९ ) साहित्यसंस्था संघीकरण खडर्याची प्रथम चर्चा सुरू झाली. सभेने संघीकरणाचें तत्त्व मान्य करून प्रातिनिधिक मध्यवर्ती साहित्यसंस्था असावी या गोष्टीला संमति दिली. तथापि संघीकरण खडर्याचा साधकबाधक विचार करून सहा महिन्यांच्या आंत एक व्यवस्थित योजना सादर करण्यासाठीं पुढील जणांची समिति नियुक्त करण्यांत आली. म. म. प्रा. द. वा. पोतदार, श्री. श्री. शं. नवरे, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. वि. त्र्यं.

शेटे, श्री. ल. म. चक्रदेव, श्री. म. दा. साठे, श्री. ग. गं. जांभेकर, श्री. य. दि. पेंढरकर, व डॉ. न. का. घारपुरे ( निमंत्रक ). यानंतर शुद्धलेखन महामंडळाच्या सभेंतील निष्कर्षांना ( म. सा. पत्रिका अंक १२७ ) ठरावरूपाने मान्यता देण्यांत आली व नियमांची अंमलबजावणी आणि प्रसार करण्यासंबंधी कार्यकारी मंडळास आदेश देण्यांत आला. 'पत्रिके'च्या १२९ व्या अंकांत मिरज संमेलन व अध्यक्षीय भाषण यासंबंधी संपादकीय मजकुरांत जें मतप्रदर्शन झालें होतें त्याविषयी सभेंत बरीच चर्चा झाली. ही चर्चा लक्षांत घेऊन कार्यकारी मंडळाने संपादकीय धोरणासंबंधी योग्य ती व्यवस्था करावी असा ठराव संमत करण्यांत आला. अध्यक्षांचे आभार मानल्यावर सभेचें काम समाप्त झालें.

**देणगीः**—परिषदेचे माजी चिटणीस डॉ. वा. दा. गोखले यांनी आपले वडील बंधु श्री. शं. दा. गोखले यांच्या नांवें परिषदेच्या संशोधनविभागासाठी ग्रंथसंग्रहासुद्धा एक नवें कपाट देणगी म्हणून दिलें. या देणगीचा साभार स्वीकार करण्यांत आला.

**संलग्न संस्था**—लोकहितवादी मंडळ, धुळें व महाराष्ट्र मंडळ, कलकत्ता २६, या दोन संस्था संलग्न करून घेण्यांत आल्या.

**संशोधन-विभाग**—श्रीशिवकल्याणप्रत-अनुभवामृताच्या आधारें ओव्यांतील प्रत्येक शब्दाची गणना करून '**अनुभवामृत-शब्दसूची**' डॉ. वा. दा. गोखले यांनी तयार केली आहे. हा एक मोठाच टप्पा गाठला गेला. आतापर्यंत अनुभवामृताच्या सात हस्तलिखित प्रतींतील पाठान्तरांची नोंदहि पूर्ण झाली आहे.

**शाखा-वृतान्तः**—कुलाबा जिल्हा शाखासभेची वा. साधारण सभा पनवेल येथे २६।७।५९ रोजीं भरून तींत पुढीलप्रमाणे पदाधिकारी निवडण्यांत आले-अध्यक्ष-श्री. के. गो. लिमये, उपाध्यक्ष-श्री. म. वि. पुराणिक व श्री. कृ. के. रहाळकर, कार्याध्यक्ष-श्री. गो. स. फडके, कोषाध्यक्ष-श्री. त्र्यं. पु. थोरात व चिटणीस-श्री. प. र. हेंद्रे व ग. वा. नवांगुळ. जिल्हा साहित्य संमेलन दिवाळीच्या सुमारास पेण येथे घेण्याचें ठरलें.

---

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १५७५।२ सदाशिव, पुणें २.
प्रकाशकः—य. दि. पेंढरकर, चिटणीस, महाराष्ट्र-साहित्य-परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

# निर्मितीची तळमळ

रु.३५०.२८ (कोटी)

लहान मुलें जशी सहज खेळांतील घरें बांधतात तशीच प्रगतीची आंस लागलेल्या जागृत राष्ट्रास नवराष्ट्र निर्माण करण्याची आकांक्षा असतें. आज दुसरी पंचवार्षिक योजना चालू आहे आणि आपल्या विविध विकास योजना पूर्ण करण्यांत भारत गुंतला आहे. योजनेखालीं नेमून दिलेला आपला वांटा पूर्ण करण्याचे प्रयत्न करून, मुंबई राज्य राष्ट्राच्या प्रगतींतील आपली भूमिका पार पाडीत आहे.

राज्याच्या द्वितीय पंचवार्षिक योजनेंत प्रस्तावित असलेल्या रु. ३५०.२८ कोटी अेकूण खर्चापैकीं, १९५६ ते १९५९ पर्यन्तच्या पहिल्या तीन वर्षांत रु. १६७.२६ कोटी खर्च करण्यांत आले. १९५९–६० मधील तरतूद रु. ९०.१८ कोटी आहे.

पहिल्या ३ वर्षांत अन्नधान्यांचे उत्पादन सुमारें ३.३६ लक्ष टनांनी वाढलें. १९५०–५१ मधील परिस्थितीशीं तुलना केल्यास, सुमारें २०,००० जास्त प्राथमिक शाळा बांधण्यांत आल्या, माध्यमिक शाळांत सुमारें १,००० नें वाढ झाली व योजनेच्या तिसऱ्या वर्षाच्या अखेरीस उच्च शिक्षणासाठीं असलेल्या संस्थांची संख्या सुमारें दुप्पट झाली असें आढळून येईल.

३.७२९ मैल लांबीच्या सडका बांधण्यांत आल्या, १०४ नवीन पूल व कॉजवेज बांधण्यांत आले, औद्योगिक कामगारांसाठीं १३,१९२ घरें बांधण्यांत आलीं, (१९५९–६० मध्यें आणखी ७,००० घरें बांधून पूर्ण होतील अशी अपेक्षा आहे) कमी उत्पन्नाच्या लोकांसाठीं ४,१६० घरें बांधण्यांत आलीं.

योजनेच्या कार्यक्रमानुसार पाटबंधारे, विद्युत्, औद्योगिक
व इतर योजनांची झपाट्यानें प्रगति होत आहे.